








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

सप्टेंबर - २०१७

विद्वद्रत्न डॉ. के. ल. उपाख्य भाऊजी दप्तरी

मराठीचे विचारविश्व व सध्याचे वैचारिक लेखन

शेती, शेतकरी आणि शासन - लेखांक १८

"मराठी साहित्यातील लक्ष्मी आणि सरस्वती"

जुने लेखन



अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७० । अंक १२। सप्टेंबर २०१७
भाद्रपद/आश्विन शके १९३९
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.









अनुक्रमणिका

# नवभारत

## सप्टेंबर २०१७

## अनुक्रमणिका

१. **विद्वद्रत्न डॉ. के. ल. उपाख्य भाऊजी दप्तरी** ३
राजेंद्र डोळके

२. **मराठीचे विचारविश्व व सध्याचे वैचारिक लेखन** १६
श्री. मा. भावे

३. **शेती, शेतकरी आणि शासन -** लेखांक - १८ २६
श्री. के. वनपाल

४. **“मराठी साहित्यातील लक्ष्मी आणि सरस्वती”** ३१
विनायक गंधे

५. **जुने लेखन** ३९

# विद्वद्रत्न डॉ. के. ल. उपाख्य भाऊजी दप्तरी

राजेंद्र डोळके

**प्रास्ताविक —**

आपल्याकडे काही उपपदे काही नावांबरोबर इतकी एकरूप झालेली आहेत की, ती उपपदे वापरल्याबरोबर त्या व्यक्तीचे नाव डोळ्यांसमोर येते. उदा., महात्मा म्हटल्याबरोबर म. गांधी, ज्योतिबा फुले; लोकमान्य म्हटले की, टिळक; आचार्य म्हटले की, विनोबा भावे, अत्रे; महामहोपाध्याय म्हटले की, द. वा. पोतदार इत्यादी. तसेच विद्वद्रत्न म्हटले की, अजूनही एकच नाव डोळ्यांसमोर येते, ते म्हणजे – विद्वद्रत्न भाऊजी दप्तरी यांचे! त्यांना जाऊन आता साठ वर्षांहूनही अधिक काळ लोटला आहे, पण अजूनही हे पद त्यांच्या नावाला जेवढे शोभून दिसते तेवढे क्वचितच अन्य कुणाच्या नावाला शोभून दिसले असेल.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात धर्मसुधारणेचा व समाजसुधारणेचा पुरस्कार करणारी जी तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी मंडळी भारतात होऊन गेली त्यात विद्वद्रत्न दप्तरी या थोर ऋषिचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागते. होय, ऋषिच! कारण एखाद्या ऋषीसारखे तपस्वी, निःस्वार्थ आणि ख-या सत्याचा शोध घेण्यात त्यांनी आपले आयुष्य घालविले. ज्ञानसाधना आणि मानवसेवा या दोन गोष्टींचा ध्यास त्यांनी आपल्या आयुष्यभर धरलेला होता. त्या ध्यासातच आपले सर्व जीवन त्यांनी घालविले आणि आपला जीवनयोग पूर्ण केला. सत्याचे ज्ञान हा भाऊजींचा मोक्ष होता, ईश्वर होता आणि बुद्धिनिष्ठ ज्ञानसाधना हा त्या ईश्वरप्राप्तीचा मार्ग होता. सत्याचे ज्ञान ज्या थोड्या लोकांना लाभले अशा प्रज्ञापुरुषांमध्ये त्यांची गणना करावी लागेल. अत्यंत सूक्ष्म बुद्धी लाभलेल्या भाऊजींनी धर्मशास्त्र, वैद्यक, प्राचीन भारतीय इतिहास, ज्योतिर्गणित, समाजशास्त्र व आणखी अनेक विषयांच्या बुडाशी भिडून त्या त्या विषयांबद्दलचे आपले सिद्धान्त प्रस्थापित केले. त्यातील महत्त्वाच्या काही विषयांवरील कार्याचा परिचय येथे करून घ्यावयाचा आहे.

**धर्मशास्त्र :-**

दप्तरी हे प्रखर राष्ट्रवादी होते. याच राष्ट्रीय भावनेतून राष्ट्राला ख-या धर्माची व्हावी तशी ओळख झाली नाही, असे वाटून ते 'धर्मशास्त्र' या विषयाकडे वळले आणि लोकांना वास्तविक धर्माचे ज्ञान व्हावे म्हणून त्यांनी 'धर्मरहस्य' हा ग्रंथ इ. स. १९१८ मध्ये लिहिला. या ग्रंथाने सनातनी विचारसरणीत खूपच खळबळ उडवून दिली व त्यावर टीका-प्रतिटीकाही पुष्कळ झाल्या. त्या टीकांना उत्तर देण्यासाठी भाऊजींना काही निबंध लिहावे लागले. हे त्यांचे निबंध 'धर्मविवादस्वरूप' या ग्रंथात सामाविष्ट करण्यात आले. त्याचप्रमाणे जैमिनीच्या सूत्रांचे शबरस्वामींनी केलेले अर्थ कसे चूक आहेत, हे दाखविण्याकरीता त्यांनी 'जैमिन्यर्थदीपिका' हा ग्रंथ लिहिला. भाऊजींचे हे तीन ग्रंथ म्हणजे धर्मपरिवर्तनवाद्यांची प्रस्थानत्रयीच होय.

दप्तरी आपले 'धर्म' ह्या विषयावरील विवेचन "अथातः पुरुर्षातः श्रेयसास धर्मजिज्ञासा" या फार पुरातन असलेल्या वसिष्ठसंहितेच्या पहिल्या अध्यायातील श्लोकापासून करतात. त्यावरून 'जे कर्म किंवा अकर्म निःश्रेयस्कर असेल ते धर्म' असा अर्थ होतो. हित, कल्याण, कुशल, श्रेयस इत्यादी निःश्रेयसाच्या पर्यायी शब्दांसाठीच धर्म आहे असे ते म्हणतात. श्रिय म्हणजे सुख, श्रेयस म्हणजे उच्चतर सुख आणि निःश्रेयस म्हणजे अतिशय अथवा परम उच्चतर सुख-निःश्रेयस म्हणजेच अतिशय उच्चतर सुख साध्य करून घेण्याकरिताच धर्माचे प्रयोजन आहे.

सुख म्हणजे वासनेचा अभाव. सुखाच्या वेळी कोणतीच वासना अस्तित्वात नसते. कोणतीही वासना उत्पन्न झाल्याबरोबर तो सुखापासून दूर जातो. अर्थात वासनाभाव म्हणजेच उच्च सुख होय. या उच्च सुखाकरिता झटण्याचाच सर्व मनुष्यांचा स्वभाव आहे आणि हे अतिशय उच्चतर सुख प्राप्त करून घेण्याकरिता धर्माचे प्रयोजन









अनुक्रमणिका

आहे.

धर्माचे स्वरूप सांगताना 'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः' ही जैमिनीने पूर्व मीमांसेत सांगितलेली अतिप्रसिद्ध व्याख्याही दप्तरींनी लक्षात घेतली आहे. 'चोदना' म्हणजे धर्मग्रंथातील आज्ञा. अर्थात आज्ञास्वरूपांच्या वेदवचनांवरून ज्याचा बोध होतो तो धर्म, असा अर्थ होतो. दप्तरींनी ह्या व्याख्येला पहिल्या व्याख्येपेक्षा कनिष्ठ प्रतीचे ठरविले आहे. कारण निःश्रेयस म्हणजेच कोणतेही कर्म सुखकर आहे की नाही याचे प्रमाण प्रत्यक्ष आणि अनुमान ही दोन होत. तर चोदनालक्षणचे प्रमाण धर्मग्रंथातील शब्द होत. अर्थात प्रत्यक्ष आणि अनुमान यांच्या तुलनेत शब्दांचे महत्त्व कमी असल्यामुळे चोदनालक्षण हे निःश्रेयस लक्षणापेक्षा कमी प्रतीचे ठरते.

धर्माचे साध्य निःश्रेयस म्हणजे अत्यं उच्चतर सुख. हे उच्चार सुख मनुष्याला इहलोकीच मिळणारे असावे असे भाऊजी म्हणतात. पण येथे परलोकातील सुखाचाही विचार करावा लागेल. कारण परलोकाचा आपल्या जनमानसावर जबरदस्त पगडा आहे. मृत्यूनंतर मनुष्य परलोकात जातो आणि परलोकात जर मुक्ती अथवा मोक्ष प्राप्त व्हायचा असेल तर इहलोकात चांगली कर्मे करणे आवश्यक आहे, अशा प्रकारच्या कल्पना आपल्यात रूढ आहेत. दप्तरींना ही विचारसरणी मान्य नाही. निःश्रेयस याचा अर्थ परलोकचे सुख हा, काही आचार्य करतात त्याप्रमाणे, अर्थ भाऊजींना मान्य नाही. कारण परलोक मनुष्यबुद्धीस अगम्य आहे. तेव्हा तिथल्या सुखाचे स्वरूप व साधने ठरवायची कशी? सुख मनुष्याला तो 'मनुष्य' असेपर्यंतच, म्हणजे जिवंत असेपर्यतंच मिळू शकते. सुख ही मनाची एक प्रवृत्ती आहे आणि मन हे जिवंत माणसालाच असू शकते. तो मृत झाल्यावर शरीररूपाने तर अस्तित्वातच रहात नाही. मग तो सुख कसे अनुभवू शकणार? सुखाचा अनुभव घेण्याकरीता मनुष्य जिवंत असलाच पाहिजे आणि म्हणून सुख हे इहलोकातच मिळू शकते. अर्थात आत्यंतिक सुखाची प्राप्ती हे जे धर्मप्रयोजन ते इहलोकातच लागू पडते. भाऊजींचे हे विवेचन कुणाही बुद्धिवाद्यास पटेल असेच आहे. कारण मनुष्य इहलोकातच जन्मतो, वावरतो आणि संपतो. परलोक पाहिलाच कुणी?

धर्म हा परिवर्तनीय आहे व धर्मात कालानुसार परिवर्तन आवश्यक आहे, हे दप्तरींचे ठाम मत होते. धर्म सांगणारे पुरुष हे त्या त्या काळाचे विद्वान पुरुष असले तरी विद्वानांच्याही हातून, अजाणता का होईना, चुका होतातच. शिवाय त्यांनी सांगितलेले धर्म त्यांच्या काळात सुखकर असले तरी नवीन परिस्थितीत ते दुःखकर होत असल्यास त्यात बदल करणे अपरिहार्य आहे असे दप्तरी म्हणतात.

धर्माधर्मनिर्णयात तात्त्विक मीमांसापद्धतीचा किंवा ऐतिहासिक पद्धतीचाच अवलंब करावा असे दप्तरी सांगतात. ऐतिहासिक पद्धती म्हणजे मागील अनुभव लक्षात घेऊन धर्मात कालानुरूप बदल करण्याचा मार्ग! धर्म सदैव तसेच राहू शकत नाहीत. पूर्वकालीन धर्म नंतरच्या परिस्थितीत अपूर्ण ठरू शकतात किंवा चुकीचेही दिसून येतात. म्हणून धर्म हाही कालानुसार बदलला पाहिजे. धर्म जर नवीन परिस्थितीत दुःखकर होत असेल किंवा अपुरा पडत असेल तर तो बदलविण्याचा किंवा नवीन धर्म निर्माण करण्याचाही अधिकार समाजातील ज्ञानी आणि तपस्वी पुरुषांना आहे. एवढेच नव्हे तर नवीन अडचणींच्या प्रश्नांचे उत्तर जर जुन्या धर्मग्रंथांत सापडत नसेल तर त्यांचे उत्तर देणारे नवीनच धर्मग्रंथ निर्माण केले पाहिजेत. निरनिराळ्या काळी निरनिराळ्या स्मृती आढळून येतात याचा अर्थ धर्मात परिवर्तन होत गेले, असाच होतो. अर्थात धर्मात वेळोवेळी परिष्करण, परिवर्तन व संवर्धन होत गेले तरच धर्म जिवंत रहातो व 'सुखस्या मूलम् धर्मः' म्हणजे आत्यंतिक सुख प्राप्त करणे हे जे धर्माचे उद्दिष्ट आहे, ते साध्य होऊ शकते, असे दप्तरी म्हणतात.

प्राचीन काळी धर्मात परिवर्तन करण्याची व्यवस्था होती. ही व्यवस्था जोपर्यंत होती तोपर्यंत हिंदू समाज जिवंत होता व त्याची रचनाही तेव्हाच्या परिस्थितीच्या दृष्टीने फार चांगली होती. परंतु धर्मपरिवर्तनाची व्यवस्था नाहीशी झाल्यापासून हिंदू समाज मृतप्राय झाला असून त्याची रचनाही बिघडून गेली आहे. आजच्या हिंदुसमाजरचनेत कितीही सद्‌गुण असले तरी धर्मपरिवर्तनाची व्यवस्था नसणे हा एकच दोष एवढा मोठा आहे की त्यामुळे इतर सद्‌गुणांची माती झाली










आहे. म्हणून धर्म परिवर्तनीय आहे असे समजून पद्धतशीर रीतीने धर्मामध्ये परिवर्तन करावे, असे दप्तरी सूचित करतात.

**समाजशास्त्र**

धर्मात परिवर्तन करावे अशी केवळ सूचनाच देऊन भाऊजी थांबले नाहीत तर प्राचीन काळातील समाजस्थितीचा व सामाजिक संस्थांचा विचार करून त्या दृष्टीने धर्मात कसे परिवर्तन होत होते याचा इतिहास ही त्यांनी थोडक्यात उभा केला आहे. 'वायुपुराणा' - वरून असे दिसते की गालव्य-गोत्रोत्पन्न आनंद नावाचा कुणी महामुनी होता. त्याला वराह-कल्पाच्या आरंभी ब्रह्मस्थान (म्हणजे समाजातील सर्वश्रेष्ठ स्थान) मिळाले. या ब्रह्माने म्हणजे ब्रह्म नावाच्या सर्वश्रेष्ठ मनुष्याधिका-याने ब्रह्मावर्तात आपले राज्य स्थापिले व समाजाच्या नित्यत्वाकरिता व सुस्थितीकरता शकापूर्वी ३१८० या काळात मनुसप्तर्षि या नावाची सामाजिक संस्था पहिल्या प्रथम निर्माण करून नवी राज्यव्यवस्था सुरू केली.

ह्या ब्रह्मा नावाच्या त्यावेळच्या सर्वश्रेष्ठ अधिका-याने समाजाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे चार वर्ण म्हणजेच वर्ग किंवा विभाग सर्व समाजाच्या हिताकरिताच पाडून त्या प्रत्येक वर्णास त्याची त्याची कर्तव्येही वाटून दिली. सुखाचा हिस्सा प्रत्येक व्यक्तीस सारखाच मिळाला पाहिजे हे जरी खरे आहे, तरी सर्वांचे बुद्धिबळ, शरीरबळ आणि मानसिक बळ सारखेच असत नाही. त्यामुळे कर्तव्यकर्मे करण्याची योग्यता सर्वांत सारखीच असत नाही. म्हणून, असे वर्ग पाडून प्रत्येक वर्गास निरनिराळी कर्तव्ये सांगणे हाच समाजाचा आत्यंतिक हिताचा मार्ग आहे व तोच आनंद या ब्रह्मदेवाने अनुसरला. गुणकर्मानुसार व त्या त्या वर्णाच्या लक्षणांनुसार त्या त्या व्यक्तीचा वर्ग समजावा असे मनुसप्तर्षींनी ठरविले.

मनु हा तेव्हाच्या सर्व लोकांमधून क्षत्रियवर्णास व वैश्यवर्णास योग्य अशी मनुष्ये निवडून काढी व सप्तर्षि ब्राह्मणवर्गात योग्य अशी मनुष्ये निवडून काढीत व उरलेली शूद्रवर्णाची मानली जात. ह्यालाच 'मन्वंतर' असे म्हणतात. असे १४ मन्वंतरे झाल्याचा उल्लेख पुराणांत आहे. ह्या मन्वंतराच्या वेळी काही खालच्या वर्णातील लोक वरच्या वर्णात घेतले जात असतील म्हणजे त्यांच्या वर्णाचा उत्कर्ष होत असे व काही वरच्या वर्णाचे लोक खालच्या वर्णात घातले जात असतील, म्हणजे त्यांच्या वर्णाचा अपकर्ष होत असे. ह्यालाच 'वर्णोत्कर्षापकर्ष' असे म्हणतात. अशा प्रकारे आपल्या समाजाची पुनर्घटना शेवटच्या मन्वन्तराच्या वेळी म्हणजे शकपूर्व १०२८ या काळी झाली.

वर्णाच्या श्रेष्ठ-कनिष्ठत्वाबद्दल ते म्हणतात, 'समाजव्यवस्थेत श्रेष्ठ वर्णाची तसेच कनिष्ठ वर्णाची संख्याही भरपूर असली पाहिजे. ('धर्मविवाद स्वरूप', पृ. २११) खरे पाहिले असता कनिष्ठ म्हणजे खरोखर कनिष्ठच नव्हेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांची उच्चनीचता कृत्रिम आणि मनुष्यकल्पितच आहे. निसर्गाने त्यांच्यात भिन्नभिन्न गुण ठेविले आहेत हे खरे. पण, कोणता गुण श्रेष्ठ किंवा कोणता कनिष्ठ हे काही निसर्ग सांगत नाही, ब्राह्मणातील बुद्धी श्रेष्ठ किंवा शूद्राचा काटकपणा व शरीरबल श्रेष्ठ हे काही निसर्ग सांगत नाही. श्रेष्ठ-कनिष्ठ भाव हा मनुष्यकल्पित आहे. उलट; समाजात कनिष्ठ लोकच श्रेष्ठांपेक्षा जास्त प्रमाणात पाहिजे असतात.' असे मत ते नोंदवतात.

शेवटच्या मन्वंतरानंतर आर्यभूमीत फार मोठ्या घडामोडी झाल्या. अनेक आर्य राष्ट्रे स्थापन झाली. त्यामुळे सर्व राष्ट्रांची एकत्र मोट बांधून मन्वंतर करणे अशक्य झाले असावे. मनुसप्तर्षिसंस्था जोपर्यंत अस्तित्वात होती तोपर्यंत हिंदू समाज जिवंत होता असे दप्तरींचे मत होते. ते म्हणतात, "पूर्वी हिंदुसमाजरचनेत मनुसप्तर्षि विचारपूर्वक व्यवस्थित पद्धतीने बदल करीत. ती व्यवस्था जोपर्यंत चालू होती तोपर्यंत हिंदू समाज जिवंत होता व ती जेव्हापासून बंद पडली तेव्हापासून निरनिराळ्या बिकट परिस्थितीतून पार पडण्याकरिता जो बदल करणे जरूर होई तो व्यवस्थितपणे होणे किंवा तो होणे ही बंद पडल्यामुळे हिंदू समाज मृतप्राय झाला आहे."

वर्णांतराचा लोप झाल्यानंतर एका वर्णाचे मनुष्य दुस-या वर्णाची कर्मे करू लागली. वर्ण संकर होऊ लागला व वर्णापासून जाती निर्माण झाल्या. ब्राह्मणांची संतती ब्राह्मणच, क्षत्रियांची क्षत्रियच अशी व्यवस्था समाजात प्रचलीत झाली. हे फारसे चूक नव्हते. कारण

अनुक्रमणिका






मातापित्यांचे गुण बहुधा संततीत उतरत असतातच. तरीपण ब्राह्मणातही क्षत्रियांचे व वैश्यातही शूद्रांचे गुण आढळतातच. मुख्य प्रश्न जातींचा नसून जातीयतेचा आहे. जातीयतेमुळे भारतीयांचे फार नुकसान झाले आहे. याविषयी दुमत नाही. पण, जातीयता नाहीशी करण्याकरिता जातीच मोडल्या पाहिजेत, हे मात्र खरे नाही. शिवाजींच्या किंवा महात्मा गांधींच्या कार्यात सर्वच जातीच्या लोकांनी सारखीच मदत केली किंवा सर्वच जाती सामील झाल्या. जाती नष्ट केल्याशिवाय जातीयता नष्ट होणार नाही हे म्हणणे चूक आहे. म्हणून जाती नष्ट करण्यामागे न लागता जातीयता नष्ट केली पाहिजे, असे त्यांचे स्पष्ट मत होते. ('स्वतंत्र भारताचा पुढील मार्ग', पृ. ३६)

भाऊजींनी अस्पृश्यतेचीही खोल मीमांसा केली आहे. अस्पृश्य कुणाला म्हणावे याबद्दल धर्मग्रंथांत दिलेली वचने उद्धृत करून त्यामागची कारणमीमांसा दप्तरींनी दिली आहे. निरनिराळ्या ग्रंथांत दिलेल्या वचनांच्या आधारे अस्पृश्यतेच्या उद्भवाबद्दल उहापोह करून ज्या जाती आजच्या काळात अस्पृश्य म्हणून गणल्या गेल्या आहेत, त्यांपैकी एकही जात धर्मशास्त्राप्रमाणे अस्पृश्य नाही असे ते म्हणतात. शास्त्रात अस्पृश्यता आहे. तथापि, आज जशी वंशपरंपरेने यावच्चंद्रदिवाकरौ चालणारी अस्पृश्यता आहे, तशी शास्त्रात नाही.

अस्पृश्यतेबद्दलची बुद्धिवादी मीमांसा करताना त्यांनी सुंदर विवेचन केले आहे. ते म्हणतात, 'अस्पृश्य हे अस्वच्छतेमुळे अस्पृश्य मानले गेले आहेत. पण, ही अस्पृश्यता कोणत्याही जातीशी निगडीत नसून, अस्वच्छतेशी निगडीत आहे. सुखाचे एक साधन उत्तम आरोग्य आहे व उत्तम आरोग्याचे एक लक्षण स्वच्छता हे आहे. अस्वच्छ कार्ये मनुष्याला अनेकवेळा करावी लागतात, पण ते तेवढ्यापुरते असतात. म्हणून अस्वच्छ वस्तू, कार्य यांनी स्पर्श झाल्यास अंग शुद्ध किंवा धुवून स्वच्छ होणे हा धर्मच असतो.'

आज समाजात ज्या जाती अस्पृश्य म्हणून गणल्या जातात. त्यांचा प्रेते, मेलेली ढोरे, चामडे इत्यादी घाणेरड्या गोष्टींशी कायम संबंध येत असतो. म्हणून त्यांना कायम अस्पृश्य म्हणून संबोधले गेले. पण ज्या जातींना आज आपण अस्पृश्य म्हणून संबोधले त्याला धर्मशास्त्रात आधार नाही, समाजात रूढ होऊन घट्ट झालेली एक कल्पना आहे. वस्तुतः मेलेली गुरे नेणे, मल काढून नेणे वगैरे कृत्ये तर आरोग्याच्या दृष्टीने आवश्यक व समाजहितकारकच आहेत. ही कृत्ये केल्यानंतर स्वच्छ झाल्यास अस्पृश्यता असण्याचे कारण नाही. अशा रीतीने कुण्या मनुष्याने समाजहितकारक कामे केल्यानंतरही आपण त्याला अस्पृश्य मानू लागलो तर तो मोठाच अधर्म होय. कारण त्यामुळे समाजात प्रेमभाव राहणार नाही आणि परस्परांशी प्रेमभावाने राहणे हेच धर्माचे परम रहस्य आहे. अशा प्रकारचे विचार डॉ. दप्तरी व्यक्त करतात.

**ज्योतिर्गणित**

ज्योतिर्गणित हा फार किचकट, गहन आणि मेंदूवर असह्य ताण पाडणारा विषय आहे. परंतु दप्तरी अशाच प्रकारच्या विषयांत हात घालीत. विश्वाची रचना, त्याचे अनंतत्व व तत्संबंधी कधीही न ढळणारे काही नियम असतात. हे नियम जसे पृथ्वीवरील घडामोडीला लागू असतात त्याप्रमाणेच अंतरिक्षातील घटकांनाही लागू असतात. एवढेच नव्हे तर अंतरिक्षातील होणा-या प्रचंड उलथापालथीचा परिणाम पृथ्वीवरील जीवनावर होत असतो. अंतराळात असणा-या सूर्य, चंद्र, तारका, ग्रह वगैरेंच्या व्यवहारामागील नियम व तत्त्वे गणिताच्या सहाय्याने शोधणे त्यालाच ज्योतिर्गणित म्हणतात. गणित या विषयात लहानपणापासूनच भाऊजींना रूची व गती होती. 'भूमितीशास्त्र' हा भाऊजींनी इ. स. १९०० मध्ये लिहिलेला प्रथम ग्रंथ. विद्याध्ययन करताना युक्लिडच्या भूमितीतील अप्रत्यक्ष सिद्धी समजणे विद्यार्थ्यांना फार कठीण जाते असे त्यांच्या अनुभवास आले. म्हणून तशा प्रकारची सिद्धी जिच्यात नाही अशी भूमिती भाऊजींनी तयार केली.

कॉलेजमध्ये शिकत असतानाच भाऊजींचे लक्ष ग्रह-गणितीकडे व विशेषतः 'ग्रहलावघवा'कडे वेधले गेले होते. 'ग्रहलाघवां'चा थोडा अभ्यास त्यांनी नागपूरचे विद्वान म. म. भटजीशास्त्री घाटे यांच्याजवळ केला होता. आपल्या शंकांचे समाधान होण्याकरिता त्यांनी 'ग्रहलाघवा'वरील 'मल्हारी दैवज्ञा'च्या टीकेचाही कसून अभ्यास केला आणि या सर्वांचा परिपाक म्हणून, ज्यावरून










थोड्या कोष्टकांनी उच्च गणिताच्या ज्ञानाशिवाय, आधुनिक ज्योतिःशास्त्रानुसार, ग्रहाचे सूक्ष्म गणित श्रमांशिवाय करता येईल असा, 'मेंदूचे तुकडे पडल्यासारखे वाटावे' इतके प्रदीर्घ परिश्रम करून, १९१२ च्या अखेरीस ग्रहलाघवासारखा 'ग्रहगणित कुतूहल' नावाचा ग्रंथ भाऊजींनी लिहिला.' 'ह्या ग्रंथासाठी लागलेल्या असह्य बौद्धिक श्रमांनी माझे रक्त, शक्ती व आयुष्य फार खाल्ले आणि अग्निमांद्य कायमचे जडले' असे भाऊजी म्हणत असत.

भारतीय ज्योतिःशास्त्राच्या अभ्यासकात कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचे नाव अग्रक्रमाने घेतले जाते. त्यांनी 'भारतीय ज्योतिःशास्त्र' हा ग्रंथ इ. स. १८९६ मध्ये लिहिला. सुमारे साडे पाचशे पानांचा हा ग्रंथराज असून ह्याची भाषा प्रासादिक आणि विवेचन बिनतोड आहे. तथापि या ग्रंथात "भारतातील ग्रहस्थिती प्रत्यक्ष पाहून लिहिलेली आहे असा माझा विश्वास आहे, पण तिची उपपत्ती आम्हास लावता येत नाही. ती उपपत्ती कोण कधी लावील ते लावो" असे उद्‌गार दीक्षितांनी काढले होते. या उद्‌गारांनी भाऊजी विलक्षण अस्वस्थ झाले आणि आपण जर ही उपपत्ती लावू शकलो नाही व ती वरून भारतीय युद्धाचा काल जर आपण ठरवू शकलो नाही तर आपले ज्योतिर्गणिताचे ज्ञान व्यर्थ होय असे वाटून ते या विषयात शिरले आणि 'भारतीय युद्धकालनिर्णय' हा अत्यंत गाजलेला निबंध त्यांनी लिहिला. गहन अरण्यात प्रवेश केल्याप्रमाणे महाभारतातील ग्रहणविचारावरून व भारतोक्त ग्रहस्थितीवरून भारतीय युद्धाचे वर्ष इ. स. पूर्व ११९७ त्यांनी ठरवले. एवढेच नव्हे तर हा काळ त्यांनी महाभारतातील इतरही उल्लेखांशी व पुराणोक्त उल्लेखांशीही जुळवून दाखविला आहे.

इ. स. १९१३ मध्ये लिहिलेला हा प्रबंध १९१८ साली 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध झाला. या प्रबंधात प्रगट झालेले भाऊजींचे ज्योतिष्याचे सूक्ष्म ज्ञान पाहून कै. श्री. कृ. कोल्हटकर इतके काही हर्षविस्मित झाले, की त्याच निमित्ताने ते मुद्दाम नागपूरला आले व त्यांनी दप्तरींची भेट घेतली. भाऊजींच्या प्रगाढ विद्वत्तेबद्दल आणि नावीन्यपूर्ण व प्रत्ययोत्पादक विचारसरणीबद्दल त्यांनी भाऊजींचे अभिनंदन केले. या निबंधातील विद्वत्ता पाहून लो. टिळकही फार प्रभावित झाले होते.

भाऊजींनी ज्योतिर्गणिताने ठरविलेला भारतीय युद्धाचा काळ व 'भारतीय युद्ध कलियुगारंभी झाले' या महाभारतातल्या वचनावरून निष्पन्न होणारा काळ यांत फरक पडल्यामुळे भाऊजींनी वायुपुराणाचा व प्राचीन युगपद्धतीचा फारच सूक्ष्म अभ्यास केला व या प्रदीर्घ अभ्यासातूनच 'वैदिक कालगणना पद्धत व श्रीरामचंद्र-जन्मकालनिर्णय' हा दीर्घ निबंध इ. स. १९२५ मध्ये लिहिला. यात त्यांनी वैदिक कालगणनापद्धतीविषयी एक नवीन उपपत्ती अभ्यासकांसमोर मांडली व तिच्या अनुरोधाने 'श्रीदाशरथी रामचंद्राचा खरा जन्मकाल' ही शोधून काढला. एवढेच नव्हे तर श्रीरामाच्या वनवासाची निःसंशय रोजनिशी त्यांनी रामायणातील ग्रहस्थितीचा विचार करून जिज्ञासूं पुढे ठेवली व रामायणकालनिर्णय ही अचूक ठरविला आहे.

वर उल्लेख केलेल्या कै. शं. बा. दीक्षित कृत 'भारतीय ज्योतिःशास्त्र' नामक अवाढव्य ग्रंथात काही उणीवा व चुका राहणे साहजिक होते. भाऊजींनी ह्या त्रुटी दूर करण्याकरिता 'भारतीय ज्योतिःशास्त्र निरीक्षण' हा ग्रंथ इ. स. १९१८ मध्ये लिहिला. प्रस्तुत प्रबंधात, प्राचीन भारतीय ज्योतिषी वेध किती सूक्ष्म घेत पण अनुमाने कशी चुकीची काढत हे भाऊजींनी फार सुंदर रीतीने दाखविले आहे. तसेच भारतीय व पाश्चात्त्य ज्योतिःशास्त्रातील सिद्धान्ताचा यथायोग्य समन्वयही केला आहे. हा प्रबंध हस्तलिखित स्वरूपात असतानाच कोल्हटकरांनी दप्तरींकडून तो मुद्दाम मागवून घेतला व पुढे इ. स. १९२९ मध्ये तो प्रकाशित होत असताना कुठल्याही ग्रंथाला प्रस्तावना लिहायची नाही असा निश्चय केला असताना देखील आणि डोळ्यांना अंधत्व आले असताना देखील या ग्रंथाला अतिशय विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहिली. प्रस्तावनेच्या शेवटी ते म्हणतात, "प्रस्तुत निबंध प्रथम इंग्रजीत प्रसिद्ध झाला असता तर त्याचे योग्य चीज झाले असते. तो मराठीत प्रसिद्ध झाल्याने त्याचे तसे चीज झाले नाही तरी त्याने मराठी वाङ्मयात एका असामान्य पुस्तकाची भर पडून त्या वाङ्मयाचे महत्त्व निःसंशय वाढणार आहे, असेच प्रत्येक मार्मिक वाचकास वाटेल."










लोकमान्यं टिळकांच्या मनात शुद्ध पंचांग प्रचलित करण्याविषयी फार कळकळ होती व त्याकरिता मंडालेहून परत आल्यावर त्यांनी पुण्याला एक व सांगलीला एक अशी दोन ज्योतिष संमेलने भरविली. सांगलीच्या संमेलनाचे अध्यक्ष कै. श्री. कृ. कोल्हटकर होते. या संमेलनात ज्यावरून शुद्ध पंचांगाचे गणित थोड्या श्रमांत सूक्ष्मपणाने करता येईल असा करण ग्रंथ तयार करण्याचा ठराव झाला. कोल्हटकरांच्या समोर दप्तरींचे नाव होतेच. त्यांच्या सांगण्यावरून लोकमान्यांनी दप्तरींना तारेने पुण्यास बोलावून घेतले व हा ग्रंथ तयार करण्याची जबाबदारी दप्तरींवर सोपविली. भाऊजींनी अत्यंत मेहनत घेऊन इतर सर्व 'करण' ग्रंथांपेक्षा सूक्ष्म व खोल असा हा ग्रंथ तयार केला. शुद्ध पंचांगाचे गणित करण्याच्या नव्या रीती, दोन-तीन कोष्टकगणकांच्या व अनेक कोष्टकांच्या सहाय्याने, भाऊजींनी त्यात शोधून काढल्या आहेत. ह्या ग्रंथाने ज्योतिर्गणिताच्या क्षेत्रात भारतीय कीर्ती भाऊजींना मिळवून दिली. हा ग्रंथ लोकमान्यांच्या मृत्यूनंतर पाच वर्षांनी इ. स. १९२५ मध्ये प्रसिद्ध झाला. ह्या ग्रंथाचा उत्तरार्ध त्यांनी १९२५ मध्येच लिहून ठेवला होता. परंतु तो प्रसिद्ध होण्यास १९७६ साल उजाडावे लागले.

पंचांगशास्त्राशीच संबंधित असलेला भाऊजींचा 'पंचांगचंद्रिका' हा ग्रंथ कै. गोपाळ केशव गर्दे यांनी भाऊजींकडून मुद्दाम लिहून घेतला. 'करणकल्पलते'तील पंचांगगणित बरेच श्रमदायक असल्यामुळे तीवरून पंचांगाचे गणित करण्याचा गणकास कंटाळाच येत असे. त्यामुळे शुद्ध पंचांगाच्या प्रसारास अडचण येत होती. ती दूर करून तिथी नक्षत्रयोगांच्या गणितात सोपेपण आणण्याकरिता भाऊजींनी प्रस्तुत प्रबंध इ. स. १९३१ मध्ये प्रसिद्ध केला.

**वैद्यकशास्त्र**

कायद्याचा अभ्यास करताना स्वतःला झालेल्या मलबद्धतेच्या व्यथेवर प्रयोग करता करताच भाऊजींचे लक्ष वैद्यकशास्त्राकडे वळले. लगेच त्यांनी आयुर्वेद, ॲलोपॅथी वगैरे शास्त्रांवरील अनेक दुर्मिळ ग्रंथ मिळवून त्यांचा सूक्ष्म व सप्रयोग अभ्यास सुरू केला. या सर्वांगीण अभ्यासातून व प्रदीर्घ चिंतनातून भाऊजींचा असा ठाम सिद्धान्त झाला की, 'डॉ. शुश्लरची बायोकेमिस्ट्री किंवा बाराक्षारपद्धतीच भारताला नैसर्गिक आरोग्याचा पुनःप्रत्यय देऊ शकते. त्यानंतर बाराक्षारचिकित्सेतील त्यांची प्रवीणता इतकी वाढली की, अनेकपॅथींचा अभ्यास करून त्यांनी 'चिकित्सापरीक्षण' नावाचा ग्रंथ १९२४ मध्ये लिहून काढला. १९३९ साली याच पुस्तकाचे, काही महत्त्वाची भर घालून इंग्रजी रूपांतर भाऊजींनी केले. 'Bodily Reaction and Examination of different systems of medicine' असे या ग्रंथाचे नाव आहे.'

मनुष्याला रोग होण्याचे अंतस्थ आणि बाह्य अशी दोन प्रकारची कारणे असतात. शरीरात उपजत असलेली अंतस्थ प्रवृत्ती आणि बाह्य गोष्टींचा शरीरावर होणारा परिणाम या दोन कारणांनी शरीर नाजूक होते आणि शरीरात व्यथा वेदना सुरू होतात, म्हणजेच रोग होतात. शरीराचा हा नाजूकपणा नाहीसा करणे हीच दप्तरींच्या मताप्रमाणे खरी चिकित्सा होय. या चिकित्सेच्या मुळाशी असलेली सामान्यतत्त्वे याचाच विचार दप्तरींनी प्रस्तुत ग्रंथात केला आहे.

चिकित्सातत्त्वे सांगताना आधी दप्तरींनी शरीराच्या प्रतिक्रिया शक्तीचा विचार करून काही नियम सांगितले आहेत. शरीरावर कोणतीही क्रिया झाली असता त्या क्रियेवर जास्त प्रमाणात प्रतिक्रिया होते. लाकूड कापून गड्डा केला तर तो गड्डा तसाच राहील. परंतु शरीरावर कापल्याने व्रण झाला तर तो व्रण भरून काढण्याची प्रतिक्रिया शरीरावर जोराने सुरू होते. अशी प्रतिक्रया होणे हे जीवाच्या जिवंतपणाचेच लक्षण आहे. दारू प्यायल्यानंतर त्याचा परिणाम हृदय आणि रक्ताभिसरण जोरदार होऊन स्नायूंची शक्ती वाढते व मन आनंदी होते आणि त्यामुळे अतिशय उत्साही वाटते. पण त्याचा भर ओसरल्यानंतर शरीर जास्त वेगाने मागे येते आणि शरीराला विलक्षण थकवा वाटतो तसेच निरुत्साही वाटते आणि ही स्थिती पहिल्या स्थितीच्या प्रमाणात जास्त असते.

शरीराच्या प्रतिक्रियाशक्तीचे हे नियम लक्षात घेऊन उपचार अथवा चिकित्सा केली पाहिजे. रोग्याचा रोग, त्या रोगाचे कारण समूळ नाहीसे करणे व त्याला त्या चिकित्सेमुळे दुसरा कोणताही रोग न उद्‌भवणे हीच खरी चिकित्सा होय.

अनुक्रमणिका

चिकित्सा दोन प्रकारच्या असतात. एक व्याधिविपरीत किंवा 'विपरीत' आणि दुसरी व्याधिविपरीतार्थकारी अथवा 'विपरीतार्थकारी'. 'विपरीत' चिकित्सा म्हणजे व्याधीचे जे चिन्ह असेल त्या चिन्हाच्या विपरीत (उलट) चिन्ह निरोगी मनुष्यात उत्पन्न करणारे औषध देणे. उदाहरणार्थ ज्याला मलबद्धता (Constipation) आहे त्याला रेचन करणारा बाळहिरडा देणे. पण ही खरी चिकित्सा नव्हे. कारण या चिकित्सेने रोग तत्काळ हटलेला दिसला तरी त्यानंतर शरीरावर होणा-या उलट प्रतिक्रियेप्रमाणे अधिक जोराची मलबद्धता प्रत्ययास येते.

'विपरीतार्थकारी' चिकित्सा म्हणजे कोणत्याही रोगावर निरोगी मनुष्यात तोच रोग उत्पन्न करणारे औषध 'सौम्य' प्रमाणात देणे. अशा औषधाने रोग प्रथमतः थोडासा वाढतो पण प्रतिक्रियेनंतर कमी होतो व पुन्हा वाढत नाही. डोक्यावर जेथे लाठीचा मार बसला असेल तेथेच पुन्हा जोराने दाबल्यास सूज व दुःख लवकर दुरुस्त होते. अंग भाजल्यास ते अंग पुनः न भाजता विस्तवाजवळ साधारणतः चटका झोंबेपर्यंत धरल्यास ते फार लवकर दुरुस्त होते. मद्याचा भर ओसरल्यानंतर अतिशय थकवा येतो. अशा स्थितीत थोडे अल्प मद्य घेतल्यास तो थकवा दूर होतो. सर्पदंशावर सर्पाच्या विषापासूनच तयार केलेल्या औषधापासून रोग बसतो. ही सर्व 'विपरीतार्थकारी' अथवा समचिकित्सेची उदाहरणे होत आणि ही 'समचिकित्सा' हीच खरी रोगहारक चिकित्सा होय असे भाऊजी म्हणतात.

येथे एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे की, ही चिकित्सा रूग्णाचा आजार अगदी टोकाला गेला असताना करू नये. कारण ही चिकित्सा सुरुवातीला रोग थोडा वाढवणारी असते. अशा स्थितीत ही चिकित्सा केल्यास रोगी दगावण्याचा संभव असतो.

समचिकित्सा पद्धती फक्त दोनच आहेत. एक होमिओपॅथी व दुसरी बायोकेमिस्ट्री किंवा बाराक्षारचिकित्सा. बायोकेमिस्ट्री हीच होमिओपॅथी होय असे भाऊजींचे मत असले तरी ते बायोकेमिस्ट्रीला होमिओपॅथीपेक्षा श्रेष्ठ ठरवितात. कारण होमिओपॅथीच्या औषधीगुणदर्शात मिश्र व अमिश्र अशी सुमारे दीड हजाराहून जास्त औषधी आहेत. पण बायोकेमिस्ट्रीत केवळ बाराच औषधांच्या चिन्हांचा चांगला अभ्यास होतो. त्यामुळे रोग्यास कोणते लक्षण आणि कोणती औषधे पाहिजेत हे चांगले ठरविता येते. मनुष्याच्या शरीरघटकांमध्ये बाराच क्षार सापडतात. याहीपुढे जाऊन 'परिणत आयुर्वेद म्हणजे बायोकेमिस्ट्रीच होय' असे ते म्हणतात. आपले म्हणणे सिद्ध करण्याकरिता त्यांनी ॲलोपॅथी, आयुर्वेद, हॅड्रोपॅथी, क्रोमोपॅथी, विद्युतचिकित्सा, मानसोपचार इत्यादी इतरही पॅथींचा अभ्यास व तुलना बायोकेमिस्ट्रीच्या संदर्भात सादर केली आहे.

'चिकित्सापरीक्षण' ह्या ग्रंथात भाऊजींनी केलेल्या विवेचनावरून वैद्यकशास्त्राचे तत्त्वज्ञान व त्यावरून निरनिराळ्या चिकित्सापद्धतींचे तौलनिक व होमिओपॅथीचे सूक्ष्म ज्ञान होईल हे खरे; पण बिमाराची प्रत्यक्ष चिकित्सा मात्र यावरून करता यावयाची नाही. ही उणीव भरून काढण्याकरिता भाऊजींनी 'सच्चिकित्साप्रकाशिका' हा ग्रंथ इ. स. १९३६ मध्ये लिहिला. या ग्रंथाचे 'रहस्यवर्णन', 'रुग्णपरीक्षण' व 'लौकिकरोगचिकित्सा' असे तीन खंड असून 'रहस्यवर्णना'त चिकित्सेची मूलतत्त्वे व बाराक्षारांची मुख्य चिन्हे समजावून सांगितली आहेत. शिवाय चिकित्सा करताना उद्‌भवणा-या अनेक अडचणींचा परिहार करून शेवटी खाद्यपेयासंबंधी उपयुक्त अशी भरपूर व नावीन्यपूर्ण माहितीही यांत दिली आहे. 'रुग्णपरीक्षणां'त रोग्यांची परीक्षा करण्याच्या सोप्या रीती दिल्या आहेत व 'लौकिकरोगचिकित्से'त सुमारे २५८ रोगांचे ३२ वर्गात वर्णन केलेले असून 'रहस्यवर्णना'तील नियमांनुसार त्यांची चिकित्सा व औषधीयोजना कशी करावी हेही दाखविले आहे. हा बृहत् ग्रंथ म्हणजे बायोकेमिक प्रॅक्टिशनरांचा वेदच आहे. अशा रीतीने भाऊजींनी ह्या क्षेत्रात संशोधन करून डॉ. हॅनिमन्, डॉ. शुश्लर यांच्या पंक्तीत स्थान मिळविले.

होमिओपॅथी ही भाऊजींनी आपली जीवननिष्ठा मानली होती. सुरुवातीला ते विनाशुल्क उपचार करीत होते पण नंतर त्यांनी तेच उदरनिर्वाहाचे साधन बनविले होते. भाऊजींच्या शेवटल्या दिवसात काही धन्वंतरी इतर पॅथीचा त्यांना आग्रह करीत. त्यावर भाऊजी त्यांना निर्वाणीचे सांगत, "होम्योपॅथीवर माझा विश्वास आहे. तिच्या प्रतिष्ठेकरिता मी शेवटपर्यंत लढलो. तिचे संगोपन

व संवर्धन ही माझी जीवननिष्ठा आहे. मी मेलो तरी चालेल. पण माझ्या जीवननिष्ठेला, स्वतःचे प्राण वाचावे म्हणून सुद्धा मी कधीच सोडणार नाही."

**उपनिषदे**

उपनिषदांवर शंकराचार्यादी पूर्वाचार्यांची भाष्ये फार प्रसिद्ध आहेत. परंतु त्यांची भूमिका व उपनिषदांचा अर्थ लावण्याची रीती ही मुळातच चुकलेली आहे, असे भाऊजींचे स्पष्ट मत होते. शंकराचार्यांनी उपनिषदांवर लिहिलेले भाष्य चूक असून समाजास हानिकारक आहे असे त्यांना वाटे. त्यामुळे उपनिषदांचा खरा बुद्धिप्रामाण्यवादी व विवेकवादी इहनिष्ठ अर्थ लोकांना कळावा यासाठी त्यांनी इ. स. १९४० ते १९४७ असे सात वर्षे अत्यंत परिश्रम करून उपनिषदांवर आपले स्वतंत्र भाष्य लिहिले. 'उपनिषदर्थव्याख्या' (पूर्वार्ध व उत्तरार्ध) 'औपनिषदक जीवनसौख्य' व 'Rationalistic and Realistic Interpretation of Upanishads' हे ग्रंथ त्यांनी लिहिले. त्याकरिता त्यांनी ईश, केन, कठ, मुंडक, प्रश्न, तैत्तिरीय, मांडूक्य, कौषीतकी, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक ही अकरा उपनिषदे निवडली. ही अकरा उपनिषदे वेदान्त म्हणजे वेदांचा अखेरचा भाग असून हींच सर्व उपनिषदांत मूळ, जुनी, प्रमाणभूत व खरी उपनिषदे होत, या मताचे ते होते. सध्या पावणेदोनशेच्या आसपास उपनिषदे उपलब्ध आहेत. पण, त्यांपैकी वरील अकरा सोडली तर बाकीची सर्व उपनिषदे, प्रामाण्याच्या दृष्टीने, भाऊजींना निरूपयोगी अतएव त्याज्य वाटतात.

भाऊजींनी लिहिलेल्या 'उपनिषदर्थव्याख्या' ह्या ग्रंथाच्या पूर्वार्धाची पृष्ठसंख्या ५०० आहे व उत्तरार्धाची पृष्ठसंख्या ५८० आहे. हा ग्रंथ व 'औपनिषदिक जीवनसौख्य' ह्या ग्रंथातील भाऊजींचे उपनिषदांवर केलेले विवेचन व उपनिषदांचा केलेला अर्थ, हे वाचून एका अपूर्व आनंदाची प्राप्ती होते. त्यांच्या या प्रचंड ग्रंथांचे सार पान-दोन पानात सांगणे हे अशक्य असले तरी स्थलमर्यादेमुळे तसेच करणे भाग आहे.

उपनिषद्-भाष्य लिहिणारे पूर्वाचार्य व भाऊजी यांच्या उपनिषदांकडे पहाण्याच्या दृष्टींत मूळापासूनच मतभेद आहेत. वेद व उपनिषदे ही ईश्वरनिर्मित आहेत; त्यामुळे ती मानवी बुद्धीस पटोत वा न पटोत, प्रमाण मानलींच पाहिजेत, अशा श्रद्धेने ब्रह्मसूत्रकार व्यास व शंकरादि भाष्यकार उपनिषदांच्या विवरणास प्रवृत्त झाले. वेद हे अपौरुषेय म्हणजे ईश्वरनिर्मित असल्यामुळे वेदांतील प्रत्येक शब्द हा सत्य मानलाच पाहिजे, तो असत्य राहूच शकत नाही, हा शंकराचार्यांच्या विचारपद्धतीतील मूलसिद्धान्त होता. त्यामुळे सर्व उपनिषदांचा अर्थ एकच आहे, त्यांमध्ये मतभेद किंवा विरोध कुठेच नाहीत अशी पूर्वाचार्यांची धारणा होती. विभिन्न उपनिषदांत परस्परविरोधी वचने आढळली तर पदरचे शब्द घालून त्या उपनिषद्वचनांची 'व्यवस्था' लावण्यातच त्यांचे पुष्कळसे बुद्धिवैभव खर्च झाले.

पूर्वाचार्यांची ही भूमिका व उपनिषदांचा अर्थ लावण्याची त्यांची ही रीती मुळातच चुकलेली आहे, असे भाऊजींचे स्पष्ट मत होते. उपनिषदांतील मतभेद मिटविण्याकरिता पदरचे शब्द घालून मूळ वाक्यांचे अर्थ फिरविणे चूक आहे. जिथे मुळातील शब्दांचे अनेक अर्थ होत असतील तिथे बुद्धीस पटेल तोच अर्थ घ्यावा, असा भाऊजींचा आग्रह आहे. या कसोटीवर उपनिषदांचे परिक्षण करीत असता शंकराचार्यांनी जिथे जिथे समन्वयवादी अर्थ केले, तिथे तिथे शंकराचार्य चुकले आहेत असे भाऊजींनी निर्भीडपणे सांगितले आहे.

उपनिषदांचा प्रतिपाद्य विषय काय आहे या पहिल्या प्रश्नाचे उत्तर दप्तरी असे देतात की, 'पुरुषार्थ सिद्धी' म्हणजे 'अत्यानंद प्राप्ती' हा उपनिषदांचा प्रतिपाद्य विषय आहे. ही अत्यानंदप्राप्ती होण्याचे साधन काय, तर ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय. ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयाने मनुष्यास या जन्मी अत्यानंदप्राप्ती होते. आपलाच आत्मा सर्व भूतात आहे असे मानून सर्व भूतांच्या हिताकरीता आमरण कर्तव्य केल्याने या जन्मातच त्याला आत्यंतिक आनंदाची प्राप्ती होते. उपनिषदांचा विषय अत्यानंदप्राप्ती आहे, यावरून उपनिषदे उपभोगांना उचलून धरतात, असा निष्कर्ष काढावयाचा नाही. वासनाक्षय हे अत्यानंदप्राप्तीचे एक साधन आहे हेही उपनिषदांवरून स्पष्ट दिसते. तेव्हा वासनाक्षय करून देहरक्षणापुरते व नवीन जीव निर्माण करण्यापुरते भोग भोगून जीवोपासना साधून अत्यानंदप्राप्ती करून घ्यावी असे दप्तरी म्हणतात.










पूर्वाचार्यांप्रमाणेच जगाच्या उत्पत्ति-स्थिती-लयाला कारणीभूत होणारे ब्रह्म हा उपनिषदांचा विषय भाऊजींनी मानला होता. परंतु पूर्वाचार्यांप्रमाणे ब्रह्म हे परलोकनिष्ठ आहे असे न मानता ते इहलोकातील आनंदप्राप्तीला साधनीभूत होणारे आहे असे त्यांनी मानले. जीवाला ब्रह्मापेक्षा ही श्रेष्ठ भाऊजींनी ठरविले आहे. भाऊजींच्या मते ब्रह्म हे ज्येष्ठ आहे पण श्रेष्ठ नाही. कारण ब्रह्म हे मुळात निद्रेतील जीवासारखे अव्याकृत किंवा अनाविष्कृत असून जीवाच्या आधाराशिवाय त्याचा आविष्कारच होत नाही. 'जीवो ब्रह्मैव फुल्लितम'- म्हणजे जीव हे ब्रह्माचे विकसन अथवा आविष्कार आहे. आनंद प्राप्त करून घेणारा हा सर्वश्रेष्ठ जीव मनुष्य हाच असल्यामुळे मनुष्य हाच विश्वात सर्वश्रेष्ठ ठरतो. ब्रह्मापासून जीव निर्माण झाला हे दप्तरींना मान्य आहे. पण शंकराचार्यांप्रमाणे ते जीव हा ब्रह्माचा विवर्त होय असे मानत नसून ब्रह्माचा विकास होय असे ते मानतात. कोळसा व हिरा ह्यातील वस्तू एकच. पण कोळशाचा विकास होऊनच हिरा बनतो. त्याप्रमाणे ब्रह्म व जीव ह्यांतील वस्तू एकच आणि ब्रह्माचा विकास होऊन जीव बनला. याप्रमाणे शंकराचार्यांचा विवर्तवाद चुकीचा ठरवून त्यांनी आपला विकासवाद कथन केला आहे. ह्या जीवरूपी हि-याला घासून व पैलू पाडून अधिक तेजस्वी कसे करावे हाच उपनिषदांपुढील प्रश्न आहे, असे ते म्हणतात.

याप्रमाणे अतिशय बुद्धिवादी पद्धतीचा व सर्वस्वी स्वतंत्र असा उपनिषदांचा अर्थ करून दप्तरींनी उपनिषद्विषयक तत्त्व चिंतनात व अभ्यासात फार मौलिक भर घातली आहे. 'उपनिषदांचे अभिनव भाष्य' या लेखात 'औपनिषदिक जीवनसौख्य' या दप्तरींच्या ग्रंथाचे परिक्षण करताना तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी म्हणतात, "अशा प्रकारचे भाष्य संभवते, अशी कल्पनाही हे भाष्य पाहण्यापूर्वी कोणा विचारवंतास वा तज्ज्ञास करता आली नसेल." ('नवभारत', जानेवारी १९७८) तर याच ग्रंथाच्या मुखपृष्ठावर छापलेल्या मजकुरात तर्कतीर्थ म्हणतात, "भारतीय मनुष्यास आधुनिक जीवनसंग्रामांत आवश्यक असलेली मौलिक दृष्टी वेदांच्या आधारे देणारा यासारखा दुसरा प्रबंध नाही. हा प्रबंध भारतीय विचारेतिहासात अनन्यसाधारण महत्त्वाचा आहे."

**इतर वाङ्मय**

वर उल्लेख केलेल्या विषयांव्यतिरिक्त इतरही अनेक विषयात भाऊजींनी लिखाण केले आहे आणि तेही तेवढेच मूलगामी आणि महत्त्वाचे आहे. "काहीतरी नवीन किंवा प्रचलित मताहून वेगळे सांगावयाचे असल्याशिवाय माझी लेखणीच चालत नाही. प्रचलीत मत लोकहिताला घातक असेल तर माझ्या लेखणीस फारच जोर येतो." असे भाऊजी स्वतःच्या ग्रंथाविषयी म्हणतात. ('मनोहर' मासिक, जून १९७३, पृ. २६३) त्यांच्या ह्या म्हणण्याची प्रचिती त्यांचे कोणतेही लिखाण वाचून आपल्यास येते. त्यांचे सर्वच वाङ्मय हे नवीन शोधांनी इतके परिपूर्ण असते की ते वाचताना एका वेगळ्याच आनंदसागरात विहार केल्याचा अनुभव येतो. विस्तारभयास्तव त्यांच्या या वाङ्मयाचा परिचय करून देता येत नाही याचे फार दुःख होते. तरीही त्यांच्या काही महत्त्वाच्या संशोधनलेखांचा उल्लेख केलाच पाहिजे.

'रामायणकालनिर्णय', 'कल्कि कोण?', 'पांच विक्रमादित्यांचा उलगडा', 'शंकराचार्यांचा कालनिर्णय', 'मौर्यपूर्व इतिहासाची साधने', 'आर्यांचा मौर्यपूर्व इतिहास', 'राजतरंगिणीविचार', 'रामायण निरीक्षण', 'भारताच्या अवनतीची कारणे व उत्कर्षाची साधने', 'अस्पृश्यता कशी जाईल?', 'व्यासांची शंकराचार्यांवर फिर्याद', 'तीन कालिदास', 'तात्त्विक मीमांसापद्धती', 'पंचांग व कालदर्श' इत्यादी त्यांच्या काही संशोधनात्मक निबंधांची नावे. यांबरोबरच हेही नमूद करणे अवश्य आहे की त्यांचे काही ग्रंथ व निबंध इंग्रजीतूनही आहेत.

'स्वतंत्र भारताचा पुढील मार्ग' हे त्यांनी इ. स. १९५० मध्ये लिहिलेले फार महत्त्वाचे लहानसे पुस्तक आहे. स्वतंत्र भारताला सुख व समृद्धी लाभण्याकरिता त्याने कोणत्या दिशेने वाटचाल केली पाहिजे, याचा विचार भाऊजींनी प्रस्तुत पुस्तकातील निबंधांत अत्यंत कळकळीने केला आहे. या पुस्तकातून त्यांनी राष्ट्रस्वामित्व (म्हणजेच समाजवादी) अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करून त्यावर आधारलेली विकास योजनाही सुचविली आहे.

**प्रखर बुद्धिवादी**

बुद्धी या शब्दाची व्युत्पत्ती 'बुध' (म्हणजे जाणणे) या धातूपासून आहे. बुद्धी म्हणजेच जाणणे किंवा जाणण्याचे

(एकमेव) साधन. ज्ञानप्राप्ती आणि सत्यशोध ही मानवी संस्कृतीची दोन अत्युच्च मूल्ये होत. ही मूल्ये जाणून घेण्याकरिता मानवाची अखंड धडपड चालू असते आणि ज्या मनःशक्तीद्वारा आपल्याला ह्या मूल्यांचे ज्ञान होते ती मनःशक्ती म्हणजे बुद्धी होय. आपल्या बुद्धीला जे सत्य किंवा योग्य म्हणून पटते ते आणि तेच सत्य किंवा योग्य म्हणून स्वीकारणे म्हणजेच बुद्धिवाद स्वीकारणे आणि जे सत्य किंवा योग्य म्हणून आपल्याला पटलेले नसते त्याचा स्वीकार न करणे, मग ते कोण्या धर्मग्रंथाने अथवा प्रेषिताने सांगितलेले का होईना, अशा रीतीने वागणे म्हणजे बुद्धिप्रामाण्यवादी असणे.

भाऊजी हे या अर्थाने प्रखर बुद्धिवादी होते. त्यांच्या सर्वच लिखाणामागे बुद्धी हेच अधिष्ठान आहे. तात्त्विक व व्यावहारिक प्रश्नांचा निर्णय करताना बुद्धी हाच एकमेव निकष ते मानीत असत. मनुष्यबुद्धीला अगम्य असणा-या अनेक गोष्टी ह्या सृष्टीत असतात आणि मानवी बुद्धी त्याचे उत्तर देऊ शकत नाही, असे मानणा-यांचाही एक पक्ष आहे आणि ह्या पक्षात मोठमोठे विद्वान असतात. बुद्धीच्या पलीकडे असलेल्या या प्रांताला श्रद्धा, अतिंद्रिय शक्ती वगैरे नावे आहेत.

दप्तरींना हे अजिबात मान्य नाही. बुद्धीस ते सर्वश्रेष्ठ मानीत. बुद्धी हेच मनुष्याच्या ज्ञानाचे एकमेव साधन आहे. बुद्धीला अग्राह्य अशा गोष्टींवर विश्वास (श्रद्धा) ठेवणे ही गोष्टच अशक्य आहे. बुद्धीला अग्राह्य असा हा विषय काळा आहे अशी श्रद्धा ठेवावी किंवा गोरा आहे अशी श्रद्धा ठेवावी? बुद्धी दुर्बल आहे हा सिद्धान्तच मुळी खोटा आहे. बुद्धी केव्हा-केव्हा चुकते हे खरे आहे. पण ही चुकीही बुद्धीच-चुकणा-यांची किंवा इतरांची बुद्धीच - शोधून काढते आणि स्वतःची चुकी स्वतःच्या किंवा इतरांच्या बुद्धीच्या सहाय्याने समजून येते. याप्रमाणे बुद्धी आणि बुद्धिप्रामाण्य याबद्दलचे दप्तरींचे अत्यंत स्पष्ट आणि खणखणीत विचार आहेत.

आपल्या धर्मग्रंथांतील वचनांमध्येही परस्परविरोधी वचने आढळतात आणि त्यामुळे वेगवेगळे अर्थ निष्पन्न होतात. या ग्रंथांत किंवा वचनात परस्परविरोध आढळून आल्यास बुद्धीने निर्णय करावा असे भाऊजी सुचवितात. ह्या पद्धतीला 'तात्त्विक मीमांसापद्धती' असे म्हणतात. ह्या पद्धतीत बुद्धी म्हणजेच अनुभव व अनुमान सर्वश्रेष्ठ साधन समजून, पदरचे शब्द न घालता शब्दांचे सप्रमाण अर्थ करून जो समन्वय व विरोधपरिहार होईल तोच इष्ट होय. ग्रंथांवरून जो निर्णय होईल तो आणि बुद्धिवरून जो निर्णय होईल तो यामध्ये विरोध आल्यास बुद्धिवरून होणारा निर्णयच प्रमाण मानावा असे दप्तरी म्हणतात.

**साधुशील जीवन**

दप्तरी यांचे घराणे मूळचे रामटेक तहसिलीतील पारशिवनी या गावचे. परंतु व्यवसायाच्या निमित्ताने तीन पिढ्यांपूर्वीच भाऊजींचे पूर्वज नागपूर येथे स्थायिक झाले. या घराण्यात केशव लक्ष्मण ऊर्फ भाऊजी दप्तरींचा जन्म २२ नोव्हेंबर १८८० रोजी नागपूर येथे झाला. भाऊजींचे वडील हे सरकारी मिडलस्कूलमध्ये शिक्षक होते. घरची परिस्थिती गरीब व लक्ष्मणरावांचा पगारही अल्प. अशाही परिस्थितीत भाऊजींची तीव्र बुद्धिमत्ता ओळखून लक्ष्मणरावांनी भाऊजींच्या इंग्रजी शिक्षणाची सोय करून त्यांना शिक्षणाकरिता सदैव प्रोत्साहन दिले. याबद्दल भाऊजी नेहमी वडिलांबद्दल कृतज्ञतेने "दूरदर्शी वडील असणे हे महद्भाग्यच आहे" असे उद्गार काढीत.

भाऊजींचे इंग्रजी चवथीपर्यंतचे शिक्षण वर्धा जिल्ह्यातील आर्वी येथे होऊन त्यापुढील हायस्कुलचे शिक्षण नागपूरला नील सीटी हायस्कूल व महाविद्यालयीन शिक्षण मॉरिस कॉलेज येथे झाले. विद्यार्थीदशेपासूनच ते गंभीर व व्यासंगी वृत्तीचे होते. या वयात बहुतांश विद्यार्थ्यांत आढळून येणारा खेळकरपणा व ललित साहित्याची आवड त्यांच्यात अजिबात नव्हती. नाटके आणि कादंब-या त्यांना वर्ज्य होत्या. गणितात ऑनर्स घेऊन १९०० साली बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण होताच, वयाचे एकविसावे वर्ष उलटण्यापूर्वीच, त्यांनी आपल्या हुशारीने मॉरिस कॉलेजात फेलोशिप मिळवली व ते कॉलेजच्या विद्यार्थ्यांना इतिहास व न्यायशास्त्र शिकवू लागले.

याच दरम्यान कॉलेजात असताना गुरूच्या शोधात ते कोणालाही न सांगता घरून निघून गेले. परंतु योग्य गुरू मिळाला नाही म्हणून नातेवाईकांच्या जाहिरातीमुळे विजापुरवरून अतिशय कृश व दाढी वाढविलेल्या अवस्थेत दोन-अडीच महिन्यानंतर घरी परत आले व सद्गुरू

मिळणे अशक्य आहे, असे सांगू लागले. नागपूरातील जुन्या पिढीतील विद्वान म. म. भटजीशास्त्री घाटे, कृष्णशास्त्री घुले व श्री. शिवदास कृष्ण बारलिंगे यांच्याजवळ त्यांनी काही काळ ज्योतिष, व्याकरण, ग्रहलाघव, सिद्धान्तकौमुदी वगैरे ग्रंथांचे अध्ययन केले.

१९०१ ते १९०५ या काळात ते नागपूरच्या पटवर्धन हायस्कुलात गणित व संस्कृत या विषयाचे शिक्षक म्हणून काम करू लागले. १९०४ साली भाऊजी कलकत्ता विद्यापीठाची बी. एल. ही परीक्षा उत्तीर्ण झाले व १९०५ साली त्यांनी वकीलीला सुरुवात केली. यानिमित्त १९०८ पर्यंत काटोल व नंतर १९११ पर्यंत चंद्रपूर येथे त्यांचे वास्तव्य झाले. याच काळात ते एक विद्वान आणि बुद्धिमान व सत्प्रवृत्त वकील म्हणून गाजायला लागले. भाऊजींचे मन प्रखर राष्ट्रवादी होते व नंतर तर ते गांधीजींच्या असहकारितेच्या आंदोलनातच सहभागी झाले होते. त्यामुळे सरकारी नोकरी त्यांना चालून आलेली असताना देखील त्यांनी तिचा कधी स्वीकार केला नाही. एवढेच नाही तर सरकारी मानसन्मानाचाही कधी स्वीकार केला नाही. 'महामहोपाध्याय' ही पदवी त्यांना सरकारने देऊ केली होती. परंतु, स्नेह्यांच्या अतिशय आग्रहालाही न जुमानता त्यांनी त्या बहुमानाच्या पदवीचा स्वीकार केला नाही.

१९०७ साली नागपूरला डॉ. मुंजे, नीळकंठराव उधोजी प्रभृती कार्यकर्त्यांबरोबर जहाल विचारसरणीचे 'राष्ट्रीय मंडळ' स्थापन्यात भाऊजींनीही पुढाकार घेतला होता. १९२० साली असहकारितेच्या चळवळीत भाऊजींनी वकीली सोडली ती कायमचीच! १९२१ साली नागपुरास स्थापन झालेल्या 'राष्ट्रीय महाविद्यालयां'चे व १९३१ साली नागपूरला निघालेल्या 'स्वराज्य महाविद्यालयां'चे ते निर्वेतन प्राचार्य होते. याच काळात नागपूरला निघालेल्या 'Young Patriot' या राष्ट्रीय विचारसरणीच्या वृत्तपत्राचे संपादन ही त्यांनी केले. शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांनी नाशिक येथे १९२६ साली स्थापन केलेल्या 'धर्ममहाविद्यालया'चे प्राचार्यपदही भाऊजींनी भूषविले होते. कायदेभंगाच्या चळवळीत ते मध्यप्रदेश काँग्रेस कमिटीचे कोषाध्यक्ष व काही काळ हरिजनसेवक संघाचे प्रांताध्यक्षही होते. १९३२ साली दिल्लीला ते गेले असता त्यांना तेथे अटक करण्यात आली होती. मृत्युपुर्वी काही वर्षे त्यांनी नागपूरला एक 'समचिकित्सा महाविद्यालय' स्थापन केले होते. आपल्या मृत्युनंतर आपल्या कुटुंबाचे काय होईल याची चिंता भाऊजींनी कधी केली नाही; पण आपण सुरू केलेल्या या महाविद्यालयाचे काय होईल, या विचाराने मात्र ते अत्यंत अस्वस्थ व संत्रस्त होत असत. नागपूर विद्यापीठाने इ. स. १९४० मध्ये किनखेडे-व्याख्यानमाला व १९४४ मध्ये वाठोडकर व्याख्यानमाला या दोन अतिशय सन्माननीय व्याख्यानमाला गुंफण्यासाठी दप्तरींना आमंत्रित केले होते तर त्यांच्या उग्र आणि एकाग्र ज्ञानोपासनेवर लुब्ध होऊन १९४१ साली त्यांना डी. लिट्. ही सन्माननीय पदवी देऊन विद्यापीठाने स्वतःलाच पुनीत आणि भूषित करवून घेतले. 'विद्वद्रत्न' ही पदवी जनतेने यापूर्वीच भाऊजींना स्वयंस्फूर्तीने दिली होती.

भाऊजींचे विचार व जीवन एखाद्या साधुप्रमाणे होते. भाऊजींचे गुरू श्री. शिवदास बारलिंगे यांनी पुढीलप्रमाणे लिहून ठेवले आहे. "रा. दप्तरींची नीतिमत्ता अत्यंत उच्च दर्जाची आहे. मी तर त्यांना 'साधु' म्हणूनच उद्देशिले आहे. त्यांची विरक्तता खरोखरीच शुकाच्या प्रतीची. त्यांना लोभ नाही. त्यांना पत्नी आहे किंवा ती त्यांना एकदा करून दिली आहे म्हणूनच त्यांचे एकपत्नीत्व, नाहीतर अक्षरशः शुकत्वच." १९३०-३१ साली महात्मा गांधी आणि दप्तरी यांच्यात येरवडा जेलमध्ये अस्पृश्यतेसंबंधी शास्त्रीय चर्चा चालू असताना लक्ष्मणशास्त्री जोशीही त्याठिकाणी उपस्थित होते. याबद्दल ते लिहितात, "दप्तरींनी वादाच्या हेक्यातही वातावरण सात्विक ठेवले होते. हेकेखरेपणातही दप्तरींचे संतपण झाकले जात नाही." ('मौजे', गांधी-स्मृती-अंक (३०-१-४९, पृ. २३)

विलक्षण सत्यप्रियता हा भाऊजींमधील दुसरा गुण होता. भाऊजींच्या भक्तमंडळीतील एक विद्वान प्रा. पा. कृं. सावळापूरकर लिहितात, "मनुष्य खोटे बोलू शकतो याचे त्यांस (भाऊजीस) कधी आकलनच झाले नाही!.... त्यांचा सरळ युक्तिवाद असा, की मनुष्य खोटे कशास बोलेल ना? त्यासाठी तर मुद्दाम श्रम करावे लागतात. ख-यासाठी काही श्रमच नाही. तेव्हा सुलभ गोष्ट टाकून






मुद्दाम कठीण गोष्ट कोण करील?" भाऊजींची ही सत्यप्रियता वकीलीच्या धंद्यात आड येत होती म्हणून त्यांनी वकीलीही सोडून दिली होती. सत्पक्षाचीच केस ते स्वीकारीत. फी स्वीकारल्यानंतर खोटा मुकादमा आहे असे जर समजले तर ते फी परत करून तो मुकादमा स्वीकारीत नसत.

दप्तरी आयुष्यभर अठरा विश्वे दारिद्र्यात राहिले. दारिद्र्याने मरेपर्यंत त्यांचा पिच्छा सोडला नाही. वस्तुतः त्यांची कायदा व वैद्यकी या क्षेत्रातली योग्यता इतक्या वरच्या दर्जाची होती की त्यांनी जर थोडी व्यवहारचतुरता दाखविली असती तर श्रीमंती त्यांच्यापासून दूर नव्हती. परंतु उदात्त जीवनमूल्यांमुळे आणि सत्यप्रियतेमुळे त्यांच्या मनाला तसा विचार कधी शिवलाही नाही. दारिद्र्य हे त्यांनी स्वच्छेने पत्करले होते व त्यात ते खूश होते. वकीलीचा व्यवसाय सोडल्यानंतर अगोदर फुकट असलेला वैद्यकीचा व्यवसाय त्यांनी चरितार्थाचा बनविला. तेथेही सत्यप्रियता व कमीतकमी पैसे स्वीकारण्याचे त्यांचे धोरण होते. आचार्य दादा धर्माधिकारी यांनी याबद्दल एक आठवण सांगितली आहे. ते लिहितात, "एकदा त्यांच्या घरी औषध आणायला गेलो असता मध्येच त्यांचा नातू भाजीकरिता पैसे मागायला आला. भाऊजींनी कोटाचे सगळे खिसे तपासले. जेमतेम दहा पैसे होते. तो बुधवार बाजाराचा दिवस होता. म्हणून नातवाने आणखी पैसे मागितले. भाऊजी म्हणाले, 'आता संपले. तेवढ्या पैशात जेवढी भाजी येईल तेवढीच आण.' योगायोग असा की, त्याच वेळी एक सुखवस्तु गृहस्थही औषधाकरिता आले होते. औषध घेतल्यावर त्यांनी भाऊजींपुढे दहा-दहाच्या दोन नोटा ठेवल्या. तसे भाऊजी उसळून त्याला म्हणाले, 'हे पहा, माझी फी एक रुपया आहे. मी काही खैरात किंवा दक्षिणा घेत नसतो.' मला एक रुपया द्या. बाकीचे पैसे मेहेरबानी करून स्वतःच्या खिशात ठेवा."

**भाऊजींची थोरवी**

याप्रमाणे भाऊजींच्या थोरपणाची कितीतरी उदाहरणे देता येतील. पण उदाहरणे तरी किती द्यायची? येथे महाराष्ट्रातील व भारतातील काही उत्तुंग व्यक्तींनी त्यांच्याबद्दल काढलेले उद्‌गार देतो.

१९१५ मध्ये लोकमान्य टिळक हे दप्तरींचा 'भारतीय युद्धकालनिर्णय' हा लेख पाहून इतके प्रभावित झाले की, शुद्ध पंचांग तयार करण्यासाठी महाराष्ट्रात हाच एक पुरुष लायक आहे. अशी खात्री पटून भाऊजींवर नवा करणग्रंथ रचण्याची जबाबदारी लोकमान्यांनी सोपविली. १९३०-३१ मध्ये महात्मा गांधी येरवडा तुरुंगात असतात त्यांना हिंदू धर्मातील अस्पृश्यतेचे शास्त्रीय स्वरूप समजावून घ्यायचे होते, त्याकरिता त्यांनी दप्तरींना चर्चा करण्यासाठी मुद्दाम बोलावून घेतले होते. श्री. कृ. कोल्हटकर, त्यांचा नेहमी, 'सॉक्रेटिससारखा तपस्वी, खरा ज्ञानी पुरुष' असा उल्लेख करीत. ते म्हणत, 'मी महाराष्ट्रात खरे ज्ञानी पुरुष फक्त दोनच पाहिले. एक केशवराव दप्तरी आणि दुसरे वामनराव जोशी.' (व्यक्तिरेखा, ले.- ग. त्र्यं. माडखोलकर, आवृत्ती १ ली, पृ. ११०) डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी आपल्या नागपूर भेटीत दप्तरींची भेट हा प्रमुख कार्यक्रम ठरविला होता. एवढेच नव्हे, तर स्वतःदप्तरींच्या महालातील राहत्या घरी जाऊन त्यांनी दप्तरींशी शास्त्रचर्चा केली होती. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे तर दप्तरींचे फार चाहते होते. त्यांनी जिथे संधी मिळेल तिथे दप्तरींबद्दल फार आदराने व गौरवाने लिहिले आहे. डॉ. सुरेश डोळके यांना तर नागपुरात दप्तरींचे मानसपुत्र म्हणून संबोधीत. त्यांनी दप्तरींच्या वाङ्मयाचा अभ्यास व प्रसार ही आपली एक जीवननिष्ठाच मानली होती. त्यांचे दप्तरींवरचे दोन ग्रंथ आणि अनेक लेख प्रसिद्ध आहेत.

या व्यक्तींच्या यादीत एका जणाचे नाव टाकले तर काही वाचकांना आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसेल याची मला खात्री आहे. ती व्यक्ती म्हणजे डॉ. बाबासाहेब आंबेडकर! डॉ. आंबेडकर म्हणतात, "....नागपूरच्या दप्तरींनी आपल्या 'धर्मरहस्य' वगैरे ग्रंथांत वेद, उपनिषदे, गीता यातील तत्त्वज्ञानाचा विचार अगदी स्वतंत्र बुद्धीने केला आहे. पूर्वपरंपरा आणि पूर्वसंस्कार हे सगळे बाजूला सारून स्वतंत्र दृष्टीने आपल्या धर्माची आणि तत्त्वज्ञानाची चिकित्सा करणारा तेवढा एकच विद्वान मला महाराष्ट्रात दिसतो. बाकीचे सगळे जुन्या चाकोरीतून रखडताहेत." (व्यक्तिरेखा, ले- ग. त्र्यं. माडखोडकर, आवृत्ती २, पृ. ३०४)








**अखेर**

जन्मभर मेंदूला विलक्षण त्रास दिल्यामुळे त्याचा परिणाम त्यांच्या शरीरावर झाला आणि शेवटी शेवटी त्यांचे शरीर कमकुवत झाले होते. मृत्युपूर्वी सहा महिने ते अंथरूणावरच होते आणि स्वतः निष्णात वैद्य असल्यामुळे आपण या दुखण्यातून उठणार नाही हे त्यांना कळले होते. त्यांच्या या काळात 'साहित्य अकादमी' ने त्यांचे काही ग्रंथ प्रकाशित करण्याचे ठरवून त्यांच्या ग्रंथांची यादी तयार करण्याचे काम डॉ. सुरेश डोळके यांचेवर सोपविले होते. ती माहिती विचारण्याकरिता रोज डोळके भाऊजींकडे जात परंतु भाऊजी इतके क्षीण झाले होते की, त्यांच्याच्याने बोलणेही होत नव्हते. त्यामुळे डोळके काहीही न विचारताच परत येत.

मृत्यूच्या दिवशी म्हणजे दि. १९।२।१९५६ रोजी सकाळी भाऊजींना विलक्षण हुशारी आली होती. डोळके त्यांच्याजवळ बसूनच होते. त्यांनी भाऊजींना साहित्य अकॅडमीची बातमी सांगून 'तुमच्या ग्रंथांची माहिती सांगता का, भाऊजी?' असे विचारले. खुणेनेच भाऊजी 'हो' म्हणाले आणि ९ वाजल्यापासून तो सव्वा दहा वाजेपर्यंत त्यांनी आपल्या अप्रकाशित व पुनर्मुद्रित करण्याची आवश्यकता असलेल्या ग्रंथांची माहिती विस्ताराने सांगितली. एवढेच नव्हे, तर त्यांच्या काही स्फुट निबंधांची, त्यांचे प्रकाशनस्थळ व प्रकाशनकाळ यासह त्यांनी धडाधड माहिती सांगितली. त्या वेळी त्यांचा आवेग 'जे काय विचारायचं असेल, ते आताच विचारून घ्या. मी सारं सांगतो', अशा प्रकारचा होता.

त्यानंतर त्यांचा तो आवेग ओसरला. नंतर त्यांनी स्वतःच स्वतःची नाडी पाहिली व त्यांनी स्वतःच सांगितले, "नाड्या गेल्या, now am sinking." या शब्दांपाठोपाठ त्यांच्या तोंडातून खोल आवाजात शब्द उमटले, "ग्रं...थ...आ...टो...प...ला." आणि त्यांचे प्राणोत्क्रमण झाले. या घटनेकडे पाहिले की असे वाटते की स्वतःच स्वतःच्या ग्रंथांची माहिती डोळकेंना सांगण्याकरिताच त्यांचे प्राण घोटाळत होते.

त्यांच्या मृत्युनंतर त्यांच्यावर अनेक विद्वानांनी श्रद्धांजली-लेख लिहिले. आपली श्रद्धांजली वाहताना (कै.) वा. ना. देशपांडे लिहितात, "डॉ. दप्तरी हे नुसते पंडित नव्हेत, तर ते ध्येयदर्शी सत्पुरुषही होते. उपनिषत्कालीन ऋषि-मुनीं सारखं त्यांचं तपःपूत जीवन होतं. पांडित्य नि साधुत्व यांच्या अपूर्व मिलाफाचा योग त्यांच्यामुळं आला होता. इतका चारित्र्यवान, इतका विनम्र, इतका ऋजु विद्वान माझ्या तरी अवलोकनात आला नव्हता!" (त्रिविक्रम, पृ. १७१)



# मराठीचे विचारविश्व व सध्याचे वैचारिक लेखन

श्री. मा. भावे.

गेल्या दोन-तीन वर्षांत अशी तक्रार बरेचदा ऐकू येत आहे की, मराठीत सध्या वैचारिक लेखन होत नाही. 'वैचारिक' या सदरात मोडणारे जे लेखन होत आहे, ते अगदी 'सुमार' दर्जाचे असते. ही तक्रार करणा-या मान्यवर व्यक्ती 'सुमार' या शब्दाचा अधिक खुलासा करताना दिसत नाहीत; किंवा त्यांच्या मताने उत्कृष्ट ठरणारे वैचारिक लेखन कोणते याची उदाहरणेही त्या व्यक्ती देत नाहीत. तेव्हा या तक्रारीचे विश्लेषण करायचे झाल्यास परंपरेने 'वैचारिक लिखाण' कशास म्हटले आहे; वैचारिक लेखनाची कोणती मानके मराठी समाज मानत आला आहे; वैचारिक लिखाणाविषयीची प्रचलित समज पुरेशी व्यापक आहे की नाही; सध्याच्या समजुतीत ज्याला वैचारिक लिखाण मानले जात नाही त्या लिखाणाचा समावेश आपण 'वैचारिक लेखन' या सदरात केल्यास आपले वैचारिक वाङ्मय समृद्ध आहे असा निष्कर्ष काढता येईल का; या व अशा पैलूंचा विचार करावा लागेल.

हे स्वयंसिद्धच आहे की, कोणत्याही समाजापुढे प्रश्न हे असतातच व तो समाज आपल्या परीने त्या प्रश्नांची उत्तरे शोधत असतो. तसे होत नसेल तर तो समाज अश्मावस्थेला पोचला असे म्हणावे लागेल. हे ही स्पष्टच आहे की, चाललेला विचार, समाजाला त्या काळी उपलब्ध असणा-या माध्यमाच्या द्वारे, समाजातील वेगवेगळ्या घटकांपर्यंत पोचत राहणार. हेही खरेच आहे की, समाजातील सामर्थ्यशाली घटक आपल्या हितसंबंधांना बाधक ठरणा-या विचारांचा प्रसार होऊ नये यासाठी प्रसार-माध्यमांवर नियंत्रण ठेवण्याच्या प्रयत्नात राहाणार. या घडामोडी सततच चालत असतात.

(१)

पारंपरिक समाजात ज्ञान व विचार यांचे एका पिढीकडून दुस-या पिढीकडे संक्रमण गुरुमुखातून होत असे. आधुनिक समाजातही ज्ञान व विचार यांचे संक्रमण होतच असते; पण गुरूने किंवा अधिकारी व्यक्तीने केलेले प्रवचन हा त्या संक्रमणाचा एकमेव मार्ग असत नाही. पुस्तके, नियतकालिके, चित्रपट, दूरदर्शन, ध्वनीफिती व चित्रफिती, माहितीजाल किंवा अगदी अलीकडे हाती आलेले साधन म्हणजे 'समाज-माध्यम' इतक्या निरनिराळ्या साधनांच्या वापराने विचार व सिद्धान्त यांचा केवळ प्रसारच नव्हे तर त्यांचा ऊहापोहही होऊ शकतो.

अधिकारवाणीतून होणारे विचारांचे दळणवळण एकाच दिशेने चाले. त्या विचारांचा प्रतिवाद करण्यास किंवा त्याविषयी शंका घेण्यास थोडाच वाव असे. प्रतिवाद करायचा झाल्यास वेगळा ग्रंथ लिहून व तो ग्रंथ मानणा-या व्यक्तींचा वेगळा संप्रदाय स्थापून केला जाई. मुद्रणकला अवगत नसल्याने ग्रंथाच्या प्रसाराला मर्यादा होत्या. हस्तलिखित प्रतींचा प्रचार बहुधा सांप्रदायिकातच राही किंवा तसा तो राहावा याची दक्षता घेतली जाई. प्राचीन काळी न्याय, मीमांसा, अध्यात्म अशा विषयांवर त्या-त्या क्षेत्रातले पंडित ग्रंथ लिहीत तेव्हा त्यांचा ग्रंथ लिहिण्यामागील उद्देश त्यांनी स्वच्छ सांगितलेला असे; तो असा की, ग्रंथाच्या अध्ययनातून सांप्रदायिकांचा आपल्या संप्रदायाच्या तत्त्वांवरील विश्वास दृढ झाला पाहिजे आणि स्पर्धक संप्रदायाच्या विचारसरणीतील त्रुटी प्रकर्षाने लक्षात आल्या पाहिजेत. मौखिक माध्यमातून विचार प्रसरणाच्या काळात निरनिराळ्या संप्रदायांच्या छावण्या पडलेल्या असत. त्यांच्यात चकमकी झडत; पण संवाद क्वचितच होई.

युरोपात मुद्रणकला अवतरल्यावर पुस्तकांच्या अनेक प्रती सहज तयार होऊ लागल्या. ज्याची इच्छा व ऐपत असेल त्याला प्रत विकत मिळू लागली. ग्रंथालये स्थापनेही सुकर झाले. त्यामुळे वैचारिकता अभिजन व श्रीमंत वर्गापुरतीच मर्यादित न राहता अधिक सार्वजनिक झाली. शास्त्रीय विषयांवरील शोधनिबंध प्रसिद्ध करणारी

अनुक्रमणिका

नियतकालिके सुरू झाली. त्या त्या विषयाचा अभ्यास करणारे लोक एकत्र येऊन अभ्याससंस्था काढू लागले व त्या संस्थांच्या विद्यमाने नियतकालिके चालवू लागले. या सा-याचा परिणाम म्हणून युरोपातील वैचारिकतेचा चेहरा-मोहराच बदलून गेला.

आपल्याकडे मुद्रणकला एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात वापरात आली. पण पा चात्त्य समाजाच्या विचार-विश्वात मुद्रणामुळे जे सर्वांगीण परिवर्तन घडून आले, तसे इथे झाले नाही. येथील सामाजिक वास्तव, ज्ञानाची व शिक्षणाची परंपरा आणि मुख्य म्हणजे ब्रिटिश राजवट यांच्यामुळे येथील वैचारिकतेला एकारलेपणा आला. तो कसा ते आत्ता पाहू.

इंग्रजी राज्य महाराष्ट्रात येण्यापूर्वीच ब्रिटिश संसदेने ईस्ट इंडिया कंपनीला आपल्या अंमलाखालील प्रदेशात दोन गोष्टी करण्यास भाग पाडले होते. पहिली गोष्ट ही की, ख्रिस्ती धर्मप्रसारकांना धर्मप्रसार करण्याची परवानगी दिली पाहिजे आणि दुसरी, प्रजेच्या शिक्षणावर वर्षाला एक लाख रुपये खर्च केले पाहिजेत. ब्रिटिश संसदेचे म्हणणे असे होते की, हिंदी प्रजा ही अज्ञान, अंधश्रद्धा व रानटी धर्म यांच्या कचाट्यात सापडून प्रगतीच्या स्रोतापासून बाजूला डबक्यासारखी कुजत पडली आहे. तिला उचलून प्रगतीच्या प्रवाहात आणून सोडणे हे इंग्रजी राजवटीचे ईश्वरदत्त कर्तव्य आहे. यासाठी शिक्षण व ख्रिस्तीधर्माचा उपदेश या गोष्टी गरजेच्या आहेत.

अठराव्या शतकाच्या अखेरीला युरोपात नवीन प्रबोधनयुग अवतरले होते. त्या युगातील महत्त्वाचा एक विचार असा होता की, नैसर्गिक शक्तींचे नियम समजून घेऊन त्यांचा वापर मनुष्याच्या समृद्धीसाठी करता आला. त्याचप्रमाणे व्यक्ती व मनुष्य-समूहाच्याही काही शक्ती असणार. जर शिक्षण व कायदे यांचा उपयोग करून आपण समाजरचनेत व व्यक्तींच्या स्वभावात सुयोग्य बदल घडवून आणला तर समाजही सुखी व तंटामुक्त होईल. कंपनीचे जे अधिकारी इंग्लंडहून इकडे येत त्यातील बरेच अधिकारी या विचाराने प्रेरित झालेले असत. त्यांना वाटे की, युरोपीय समाजात धार्मिक विचार, जमिनदारी व जमिनदारांचे राजकीय वर्चस्व यांच्यामुळे जे परिवर्तन घडवणे अवघड झाले आहे ते परिवर्तन अधिकाराच्या बळावर हिंदुस्थानात घडवून आणणे शक्य आहे. इथे आपल्याकडे सत्ता आहे आणि परिवर्तनाला होणारा विरोध दुबळा असण्याची शक्यता आहे.

(२)

प्रथम काही वर्षे हिंदी प्रजेला कोणत्या विद्या शिकवायच्या आणि त्यांचे शिक्षण कोणत्या माध्यमातून द्यायचे याची बरीच चर्चा झाली. अखेर, १८५४ साली, इथे इंग्रजी भाषेतून पा चात्त्य विद्यांचे शिक्षण द्यावे, असा निर्णय झाला. याचा परिणाम असा झाला की, एतद्देशीय भाषा उच्च विचारांच्या दळणवळणाच्या पायरीपर्यंत पोचल्याच नाहीत. दैनंदिन व्यवहार व फार तर ललित-साहित्य यांच्यातच त्यांचा वापर राहिला. बहुतेक सगळा ज्ञानव्यवहार इंग्रजीतून चालत राहिल्याने मराठी शोध-नियतकालिके, मराठीतून चालणारी चर्चासत्रे व परिषदा यांची गरजच वाटली नाही. महाराष्ट्रातील उच्च शिक्षित व्यक्ती इंग्रजीतूनच पत्रव्यवहारदेखील करू लागल्या. इतिहासाचार्य राजवाड्यांनी सांगितले आहे की, ते महाविद्यालयात असताना धोब्याशीदेखील (एकतर्फी) इंग्रजीत बोलत! या सगळ्याचा आणखी एक दूरगामी व अनिष्ट परिणाम आला. तो असा की, हा उच्च-शिक्षित माणूस आपल्या समाजापासूनच नव्हे तर कुटुंबापासूनही वेगळा पडला.

या काळात काही मराठी विद्वानांनी उदा., डॉ. भांडारकर, लोकमान्य टिळक, इंग्रजीतून ग्रंथ आणि शोधनिबंध लिहून जागतिक स्तरावरही चांगली कीर्ती संपादन केली. तथापि, शोधनियतकालिके किंवा वैज्ञानिक व सामाजिक शास्त्रावरील ग्रंथनिर्मिती यांच्या बाबतीतील प्रगती नगण्य होती. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे 'अनेक विद्यामूलतत्त्व-संग्रह' किंवा मोडकांची विज्ञानावरील पुस्तके ही महत्त्वाची खरी; पण ती बहुशः इंग्रजी पुस्तकांच्या अनुकरणाने लिहिली होती. इंग्रज सरकारने विज्ञान, रसायन, जीवशास्त्रे, अभियांत्रिकी इत्यादी विषयांच्या शिक्षणाकडे बरेचसे दुलक्षच केले होते. त्यामुळे या विषयांवरील विचार-विनिमय मराठीतून होण्याची शक्यता फारच थोडी होती. साहजिकच हे वैज्ञानिक विषय सोडाच पण अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, समाजशास्त्र अशा मानवीय शास्त्रांची चर्चा करण्यासाठी लागणारे भाषिक कौशल्यही






१९ व्या शतकातील मराठी समाजात विकसित झाले नाही.

कंपनीच्या सनदेला मुदतवाढ देताना झालेल्या चर्चेत व नंतरही इंग्रजांनी भारताविषयी केलेल्या लेखनातून (उदा., जेम्स मिलने लिहिलेला 'हिस्ट्री ऑफ ब्रिटिश इंडिया' हा ग्रंथ) हिंदी लोकांच्या मागासलेपणाची जी लक्षणे सांगितली जात त्यात स्त्रियांवरील अन्याय, मूर्तिपूजा, बळी देणे अशा प्रथांचा उल्लेख केला जाई. बंगालधील भद्र लोकांचे या चर्चांकडे फार लक्ष असे. त्यांच्यातील मोठे पुढारी राजा राममोहन रॉय, पंडित विद्यासागर, महर्षी देवेन्द्रनाथ टागोर यांनी सतीप्रथेला विरोध, विधवाविवाह, अमूर्त ब्रह्माची उपासना करणारा ब्राह्मोसमाज यासारख्या चळवळी सुरू केल्या. तो आदर्श पुढे ठेवून आपल्याकडील नवसुशिक्षितांनीदेखील विधवाविवाह, स्त्री-शिक्षण, प्रार्थनासमाज या चळवळी हाती घेतल्या. याबाबतचे विचारविनिमय व योजना इंग्रजीतूनच मांडल्या जात. पण थोड्याच दिवसात असे ध्यानात आले की, नव्या विचाराचा प्रसार सामान्य माणसापर्यंत पोचण्यासाठी या चळवळींविषयी मराठीतूनही बोलले व लिहिले गेले पाहिजे. या चळवळींच्या अनुषंगाने मराठीतील वैचारिकता प्रौढ होत गेली.

वर सांगितले आहेच की, कंपनीचा कारभार चालवण्यासाठी इंग्लंडहून जे अधिकारी येत ते नवीन प्रबोधन युगातील विचारांच्या प्रभावाखाली असत. जर समाजोपयोगी कायदे केले आणि शिक्षणाच्याद्वारे समाजात नव्या विचारांची पेरणी केली तर समाजातील शक्तींचा विधायक कार्यासाठी उपयोग होऊन सामाजिक जीवन संपन्न व सौहार्दपूर्ण होते असा त्यांचा विश्वास होता. त्यामुळे कंपनी सरकारने व नंतर इंग्रज सरकारने खाजगी मालमत्तेला संरक्षण देणारे कायदे केले, धर्मांतर केले तरी वारसाहक्काने येणा-या संपत्तीवर धर्मांतरिताचा हक्क राहील असा कायदा केला, विधवा विवाहाला कायद्याची मान्यता दिली, संमतिवयाचा कायदा केला. या सर्व कायद्यांचे उद्देश आपल्या समाजाच्या दृष्टिकोनातून विघातक व अनिष्ट होते. पण नवसुशिक्षितांनी यातील बहुतेक कायद्यांचे समर्थन केले. याविषयीचे वाद वृत्तपत्रातून, सभातून, उलट-सुलट पत्रकातून रंगले. श्रुति-स्मृति-पुराणांचे दाखले दिले गेले. या चळवळींच्या द्वारे समाज-शिक्षण होत गेले. मराठीतील वैचारिक लेखनाचा मोठा भाग या चळवळींच्या अनुषंगाने घडत गेला.

इंग्रजी शिक्षण घेतलेल्या याच लोकांना नंतर अशी इच्छा झाली की, राज्यकारभारात आपण राज्यकर्त्यांकडून अधिकाधिक वाटा मिळवला पाहिजे. राज्यकर्त्यांची मर्जी संपादून, त्यांच्याकडे हट्ट धरून, समाजातील इतर घटकांच्या पाठिंब्याचा दबाव आणून किंवा सरकारी निर्णयांच्या विरोधात लोकचळवळी उभ्या करून ही मुख्य मागणी सरकारच्या गळी उतरवणे शक्य होईल, असे या सुशिक्षित पुढा-यांना वाटले. सामान्य मनुष्याच्या पाठबळाची गरज असल्याने या चळवळींचा प्रचार मराठी वृत्तपत्रातून लेख लिहून, मराठीतून भाषणे करवून, गावोगावी चळवळीची केंद्रे स्थापून व तेथे जनतेचे हक्क, सरकारकडून होणारे अन्याय यांच्याविषयी मराठीतून चर्चा घडवून करण्यात आला. मुद्दा असा आहे की, मराठीतील विचारविश्वाची घडण व मराठीतील वैचारिक वाङ्मयाचा विकास कोणत्या ना कोणत्या चळवळीच्या आधारे होत गेला.

(३)

विसाव्या शतकातदेखील स्वातंत्र्यापूर्वी व नंतरही कित्येक वर्षे वैचारिक लेखन म्हणजे कोणत्या तरी राजकीय वा सामाजिक चळवळीच्या संदर्भात किंवा त्या चळवळीला प्रेरणा वा पाठिंबा देणारे लेखन, हा समज दृढ होत जाईल अशीच परिस्थिती राहिली.

महात्मा फुले यांनी 'सत्यशोधक समाज' ही चळवळ सुरू केली. 'समाज' सुरू करण्यापूर्वी व नंतरही त्यांनी प्रचलित हिंदू समाज व ब्राह्मण जात यांच्यावर कठोर टीका करणारे लिखाण केले. पण ज्या काळात हे लिखाण झाले – म्हणजे १९ व्या शतकाच्या शेवटच्या २५ वर्षांत - तेव्हा तरी त्या विचारांचा प्रभाव मंद होता. सत्यशोधकी व ब्राह्मणविरोधी विचाराला जोर आला तो मॉंटफर्ड सुधारणा अंमलात येऊन प्रांतिक विधिमंडळाच्या निवडणुका १९१९ साली जाहीर झाल्यावर. मतदार होण्याचे निकष-शिक्षण व उत्पन्न यांच्यावर ठरवले होते. मराठा समाजात शिक्षित लोक कमी असले तरी उत्पन्नाच्या कसोटीला उतरून पुष्कळ मराठा पुरुष मतदार झाले होते. मराठा जातीत राजकीय जागृती कमी होती आणि








काँग्रेस पक्षातील ब्राह्मणांचे पुढारीपण प्रतिष्ठीत होते. या निवडणुकांमुळे मराठा जातीतील लोकातही राजकीय आकांक्षा जागी होऊन त्यांनी 'ब्राह्मणेतर पक्ष' काढला. ब्राह्मणांविरुद्धचा राग व्यक्त करण्यासाठी ब्राह्मणेतर पक्षाने सत्यशोधकी तमाशे व मेळे काढले आणि सत्यशोधकांचा विचार व वेदोक्त चळवळीत (१९०५) ब्राह्मणांविरुद्ध उफाळलेला असंतोष यांचा उपयोग केला. ब्राह्मणेतर वृत्तपत्रे निघाली, पुस्तिका प्रसिद्ध झाल्या व महाराष्ट्राच्या वैचारिक वातावरणात मोठी घुसळण होऊन गेली. सत्यशोधकी विचार व ब्राह्मणेत्तर चळवळ या गोष्टी मराठी विचार-विश्वाच्या अविभाज्य भाग होऊन बसल्या.

विसाव्या शतकात, पण स्वातंत्र्यापूर्वी, महाराष्ट्रात दोन निखळ वैचारिक चळवळी झाल्या, पण त्यातही राजकीय अंतःप्रवाह नव्हते, असे नाही. चळवळींच्या केन्द्रस्थानी असलेले विषय येथील परंपरेतून उद्‌भवले होते. पहिली चळवळ पंचांगशुद्धीची. त्या चळवळीतील ज्योतिषशास्त्राशी संबंधित तपशीलात आता जायला नको. त्या वेळी अनेक सुशिक्षित माणसांचे म्हणणे होते की, आपण सरळ पा चात्त्य पंचांग जसेच्या तसे स्वीकारावे, पण लोकमान्य टिळकांचा आग्रह असा होता की, आपल्याकडे ज्योतिषांची मोठी परंपरा आहे. पूर्वीही पंचांगात दुरुस्ती करण्याचे प्रसंग आले होते. त्या वेळी ज्योतिषपंडितांनी विद्वत् - सभा भरवून व ऐकमत्य घडवून आणून दुरुस्त्या केल्या होत्या. आत्ताही आपण हाच मार्ग अवलंबला पाहिजे. त्या काळी भारतीय ज्योतिषाचा विचार करणारी शोध-नियतकालिके नव्हती (व आजही नाहीत.) त्यामुळे बरीच चर्चा वृत्तपत्रातूनच चालली व जिज्ञासू वाचकांना अयनांश, संपातबिंदू इ. पारिभाषिक शब्दांचा परिचय झाला. पुढे टिळक मंडालेहून परत आल्यावर ज्योतिष्यांच्या सभा झाल्या व एकमत घडून आले. नागपूरचे ज्योतिषविशारद भाऊजी दफ्तरी यांनी 'करणकल्पतरू' नावाचा, शुद्ध पंचांग रचण्याला उपयोगी, करणग्रंथ लिहिला. (स्वातंत्र्यानंतरही भारतीय पंचांगाचा विचार चालूच राहिला. १९५६ साली सरकारने सध्याचे 'राष्ट्रीय पंचांग' तयार केले.) पंचांगशुद्धीच्या चळवळीलाही अस्मिता चेतविण्याचा राजकीय अंतःप्रवाह होता व तो लोकांच्या लक्षात आला होता.

दुसरी भाषाशुद्धीची चळवळ १९३० च्या दशकात सुरू झाली. इतिहास पाहिला तर चळवळीचा उगम छत्रपती शिवाजीराजांपर्यंत मागे नेता येतो. त्यांनी आपल्या मंत्र्याकडून 'राज्यव्यवहारकोश' हा ग्रंथ तयार करून घेतला. उद्देश असा होता की, राज्यकारभारातील फार्सी शब्दांना मराठी व संस्कृत पर्यायी शब्द द्यावेत. कोश संस्कृत भाषेतच आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांनी बंधमुक्त झाल्यावर भाषाशुद्धीची चळवळ सुरू केली. आता इंग्रजी व फार्सी शब्दांना मराठी व संस्कृत प्रतिशब्द तयार करावयाचे होते. नंतर माधवराव पटवर्धन (ऊर्फ कवी माधव ज्युलियन) यांनी भाषाशुद्धीला पाठिंबा देऊन आपल्याच जुन्या कवितातील फार्सी शब्द काढून त्या कवितांचे शुद्धीकरण केले. या काळात भाषेची घडण काय असते, परभाषेतील शब्द कोणत्या उद्देशाने व कोणत्या प्रक्रियेतून स्वीकारावेत, नवे शब्द रूढ कसे होतात अशा प्रश्नांचा सखोल विचार झाला. प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनीही महत्त्वाचे योगदान दिले होते. प्रा. माधवराव पटवर्धन हे स्वतः फार्सी भाषेचे अभ्यासक होते व फार्सी भाषाच शिकवीत असत.

भाषाशुद्धीच्या या चळवळीला एक अंतःस्थ धार होती, ती हिंदू-मुस्लीमवादाची. अशी उगीचच समजूत होती की, फार्सी व उर्दू या केवळ मुसलमानांच्याच भाषा आहेत. त्यामुळे मराठीतील फार्सी किंवा उर्दू शब्द हे मुस्लिम वर्चस्वाची चिन्हे होत व भाषाशुद्धी हे मुस्लिम-वर्चस्वाला दिलेले आव्हान होय, असा सार्वत्रिक समज होता. भाषाशुद्धी सामान्य माणसापर्यंत पोचण्याचे हे एक कारण होते. याबरोबर हेही खरे होते की, शिक्षण, क्रीडा, राजकारण, करमणूक या क्षेत्रातील कित्येक इंग्रजी शब्दांना चपखल प्रतिशब्द या चळवळीच्या निमित्ताने घडवण्यात आले व ते मराठीत रूळून गेले.

तीसच्या दशकात देशात चार प्रकारच्या राजकीय विचार-प्रणाली प्रामुख्याने वावरत होत्या. त्या म्हणजे गांधीवाद, साम्यवाद, समाजवाद व थोड्या उशीराने मंचावर आलेला हिंदुत्ववाद. या चारही विचार-प्रणालींचे नजीकचे ध्येय हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळवून देणे हेच होते. सत्याग्रह, अहिंसा, आत्मक्लेश व विरोधकांचे हृदय-परिवर्तन यांच्या सहाय्याने स्वातंत्र्य मिळवता येते

आणि तसेच ते मिळवले पाहिजे हा गांधीवाद्यांचा आग्रह होता. समाजवादी व साम्यवादी या दोघांचीही इच्छा लोकचळवळीतून – वाटल्यास हिंसक कृत्येही करून स्वातंत्र्य मिळवावे अशी होती. जे स्वातंत्र्य मिळावयाचे त्यात रयतेला आपल्या इच्छांची पूर्तता होईल याचे आश्वासन मिळायला हवे. त्यासाठी या दोन्ही प्रणाली आर्थिक व सामाजिक न्यायाचे आश्वासन देत होत्या आणि दोन्ही विचारप्रणालींचा खाजगी मालमत्तेला विरोध होता. दोघात फरक असा होता समाजवाद्यांना समता ही लोकशाही सरकारने कायदे करून अमलात आणावी असे वाटत होते; तर, साम्यवादी यासाठी सशस्त्र क्रांती व्हावी लागेल, या मताचे होते. अर्थात्, या गोष्टी स्वातंत्र्यानंतर व्हावयाच्या होत्या. हिंदुत्ववाद्यांची भीती अशी होती की, गांधीजींच्या नेतृत्वाखालील कॉंग्रेसपक्ष मुसलमानांना अवाजवी सवलती देऊन हिंदूंच्या हिताचा नाश करील. तेव्हा कॉंग्रेसवर दबाव आणणारा हिंदुमहासभा हा हिंदुत्ववादी पक्ष त्यांनी स्थापन केला होता.

या चारही विचारांचे चार पक्ष किंवा संप्रदाय हिंदुस्थानात काम करीत होते. त्या संप्रदायांच्या विचारप्रणालींनी एकच खळबळ देशात माजविली होती. या खळबळीतील चळवळ वजा केली तर जी चर्चा उरते तिच्यामुळे महाराष्ट्रात (व इतरत्रही) वैचारिक लेखनाला मोठा वाव मिळाला. स्वातंत्र्यानंतरही ही चर्चा झडतच राहिली. स्वातंत्र्य मिळण्याच्या सुमाराला 'प्रसाद प्रकाशना'ने 'वादविवादमाला' नावाची ग्रंथमाला काढली होती. त्या पुस्तकात ही चर्चा वाचायला मिळते.

टिळकांच्या मृत्यूनंतरच्या काळात वैचारिक नियत-कालिकांनी महाराष्ट्रातील वैचारिक लेखला उत्तेजन दिले. 'विविधज्ञान विस्तार' नावाचे मासिक १८६० च्या दशकापासून चालत आले होते. पण आता 'चित्रमयजगत्', 'लोकशिक्षण' (आधी ओकांचे व नंतर जांभेकरांचे), 'किर्लोस्कर' व थोड्या उशीराने 'सह्याद्री' ही चर्चानियत-कालिके सुरू झाली. यांनी वर सांगितलेल्या चार विचारप्रणालींची चर्चा तर चालवलीच पण समाजात वेळोवेळी ज्या विचारांच्या लहरी उदा., नवमतवाद, बुवाबाजी व अंधश्रद्धा यांच्यावर टीका, फ्रॉइडचे मानसशास्त्र उद्‌भवल्या त्यांचीही साक्षेपी नोंद घेतली. र. धो. कर्वे यांचे 'समाजस्वास्थ्य' हे मासिक लैंगिक समस्या व लैंगिक आरोग्य यांची तळमळीने चिकित्सा करीत असे.

आपण पाहिले की हिंदुसमाजात, विशेषतः स्त्रियांच्या परावलंबी स्थितीत, सुधारणा घडवून आणण्याची चळवळ नवसुशिक्षितांनी १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात केली. मात्र महात्मा फुले, डॉ. आंबेडकर यांना जी सुधारणा अपेक्षित होती ती जातींच्या उतरंडीमुळे हिंदुसमाजात भिनलेली भीषण विषमता नष्ट करणारी सुधारणा. त्या विषमतेचा सर्वात दाहक प्रत्यय अस्पृश्यतेतून येत होता. डॉ. आंबेडकरांच्या पूर्वीही शिवराय जानबा कांबळे यांनी 'सोमवंशीय मित्र' नावाचे मासिक चालवून अस्पृश्यांच्या सुधारणेसाठी प्रचार चालवला होता. परंतु, डॉ. आंबेडकरांनी अस्पृश्यांच्या हक्कांसाठी चळवळ सुरू केली. त्यासाठी त्यांनी वृत्तपत्रे काढली, संघटना उभारली, सत्याग्रह केले, व्याख्याने दिली.

गोलमेज परिषदेत डॉ. आंबेडकरांनी अशी मागणी केली की, अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ द्यावेत. ही मागणी इंग्लंडच्या पंतप्रधानांनी मान्य केली व तशी तरतूद सुधारणेच्या नव्या कायद्यात घालण्याचे आश्वासन दिले. अस्पृश्याना राखीव जागा द्यायला गांधीजींचा विरोध नव्हता; पण स्वतंत्र मतदारसंघ देण्यास होता. त्यामुळे या तरतुदीच्या विरोधात गांधीजींनी बेमुदत उपोषण केले. अखेरीस 'पुणे करार' होऊन डॉ. आंबेडकरांनी स्वतंत्र मतदार संघांचा आग्रह सोडून दिला व राखीव जागांवर समाधान मानले. हा इतिहास सर्वांना माहीत आहे.

त्यानंतर गांधीजींनी अस्पृश्यता निवारणाची चळवळ हाती घेतली. पारंपरिक पद्धतीने धर्मशास्त्रांचे शिक्षण घेतलेले जे शास्त्री-पंडित होते, त्यांचे म्हणणे होते की, अस्पृश्यता ही हिंदुधर्मशास्त्राने मान्यता दिलेली प्रथा आहे. तिच्या विरोधात काम करणे हा हिंदुधर्माच्या मूलभूत तत्त्वावरच हल्ला आहे. अशा सनातनी पंडितांना विरोध करायला पारंपरिक पद्धतीने शास्त्राभ्यास केलेले परिवर्तनवादी पंडित उभे राहिले व धर्मशास्त्रात अस्पृश्यतेला आधार नाही असे प्रतिपादन करू लागले. स्वामी केवलानंद सरस्वती, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कोकजे शास्त्री, भाऊजी दफ्तरी या विद्वानांनी 'धर्मनिर्णय मंडळ' नावाची

संस्था काढली व सनातन्यांच्या विरोधात पुस्तिका काढून वाटल्या. लेख लिहिले, विद्वत्सभांकडून अस्पृश्यताविरोधी ठराव मंजूर करून घेतले.

आतापर्यंत आपण स्वातंत्र्यपूर्वकाळात झालेले वैचारिक लेखन पाहिले ते आवाहनात्मक किंवा उपदेशपर असे होते. कोणत्या ना कोणत्या मताचा प्रचार करावा, वाचणा-याने ते मत स्वीकारून त्याप्रमाणे आचरण करावे व दुस-यांना ते समजावून द्यावे हे सांगण्यासाठी हे वैचारिक लिखाण झालेले होते; किंवा तसा उद्देश नसला तरी वाचक ते वाङ्मय ती अपेक्षा ठेवून वाचत होते. पण वैचारिक लिखाण फक्त याच पद्धतीचे असले पाहिजे, असे नाही. कोणतातरी विषय घेऊन त्याची तटस्थपणे व तर्काधारे मांडणी करावी व निष्कर्ष काढावेत; निरनिराळ्या संकल्पनांची व संज्ञांची चिकित्सा करावी अशा त-हेचे लिखाण वैचारिक असते व ते वाचकाला 'अमुक एक कर' अशी हाकही देत नाही. याचे एक टोकाचे उदाहरण म्हणजे युक्लिडची भूमिती.

भूमिती सारखा तटस्थ व निखालस बौद्धिक रचना असलेला विषय सोडला तरी इतरही क्षेत्रे अशी असू शकतात व आहेत की जेथे निर्विकारपणे विचार केला जातो व निवाडे केले जातात. अशा ठिकाणी वाचकाला आवाहन करण्याचा किंवा उपदेश देण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. अशा त-हेचे वैचारिक लिखाण मराठीत झाले नाही, असे नाही. निदान चार तरी बौद्धिक क्षेत्रात फार ताकदीच्या मराठीच्या विद्वानांनी मोठी कामगिरी केली.

पहिले क्षेत्र म्हणजे कोशवाङ्मय डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी 'महाराष्ट्र ज्ञानकोशा'चा विशाल प्रकल्प केवळ सामान्य माणसांच्या वर्गणीतून पैसे जमवून सिद्धीस नेला. त्यानंतर इतर अनेक कोश योजिले गेले व पूर्ण झाले. 'मराठी शब्दकोश' य. रा. दाते व चिं. ग. कर्वे यांनी रचला. मराठी ग्रंथांची सूचीही दात्यांनीच तयार केली. ज्याला कोशच म्हणावे लागेल असा आणखी एक ग्रंथ म्हणजे 'भारतीय ज्योतिषशास्त्र' त्यानंतर चरित्रकोश, म्हणींचा कोश असे आणखी कोश तयार झाले.

दुसरी घटना म्हणजे इतिहास-संशोधन. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'निबंधमाले'त 'इतिहास' नावाचा निबंध लिहिला. पुढे टिळकांनी शिवाजी-उत्सव चालू केला. त्यापासून स्फूर्ती घेऊन राजवाडे, पाटसनीस, वासुदेवशास्त्री खरे व नंतर य. रा. गुप्ते आणि वा. सी. बेंद्रे या दीर्घोद्योगी व प्रतिभाशाली अभ्यासकांनी ऐतिहासिक कागदपत्रे, वस्तू, चित्रे, वस्त्रे, हत्यारे, मूर्ती गोळा करण्याचा आणि मोडी किंवा फार्सी कागदपत्रांची बाळबोधीत व मराठीत रूपांतरे प्रसिद्ध करण्याचा ध्यासच घेतला. ही कामे जरी त्यांनी पोटतिडकीने केली तरी या सामग्रीचा अभ्यास करणे व निष्कर्ष काढणे शक्यतो निर्विकारपणे व न्यायबुद्धी जागृत ठेवून केले पाहिजे, हे त्यांना मान्यच होते. गो. स्. सरदेसाई यांनी इ. स. ११०० पासून १९०० पर्यंतच्या ८०० वर्षांचा इतिहास लिहून 'रियासतकार' असा लौकिक मिळवला. महाराष्ट्राचा मुसलमानपूर्व इतिहास ल्याहायचा तर ताम्रपट, शिलालेख, नाणी, उत्खननातून मिळालेले अवशेष यांचा अभ्यास करायला हवा. राजवाडे, वा. वि. मिराशी, मो. गं. दीक्षित यांच्यासारख्या विद्वानांनी या विषयाच्या अभ्यासाचा भक्कम पाया रचला.

भारतीय विचारसंचिताचा शोध ही स्वातंत्र्यपूर्ण काळातील विद्वानांनी विकसित केलेली महत्त्वाची ज्ञानशाखा. वैदिक, तांत्रिक, बौद्ध, जैन आदींनी विकसित केलेले तत्त्वज्ञान, त्या तत्त्वज्ञानातील उपशाखांचा अभ्यास करणारे पंथ, त्यांनी निर्माण केलेले संस्कृत, पाली, अर्धमागधी अशा भाषातील वाङ्मय यांचा अभ्यास करून या तत्त्वज्ञानांची सुसूत्र आणि सुसंगत मांडणी करणे, हा विचारसंचिताचा शोध होय.

भगवद्‌गीतेचा सखोल अभ्यास करून लो. टिळकांनी 'गीतारहस्य' हा अनमोल ग्रंथ लिहिला. नंतर विनोबांनी 'गीताप्रवचने' आणि 'स्थितप्रज्ञदर्शन' ही अप्रतिम पुस्तके लिहिली. चिं. वि. वैद्यांनी लिहिलेला 'महाभारताचा उपसंहार' हा वाचकाला अभ्यासाची खोली व विस्तार या दोन्हींच्या योगाने भारून टाकणारा ग्रंथ. धर्मानंद कोसंबी, पु. ल. वैद्य यांनी बौद्ध तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. पुढे डॉ. आंबेडकरांनी बौद्ध धर्माचा व तत्त्वज्ञानाचा एका निराळ्याच दृष्टिकोनातून विचार केला.

स्वातंत्र्यपूर्वकाळातील मराठी विचारविश्वातील चौथा लक्षणीय विभाग म्हणजे साहित्यनिर्मिती व साहित्यसमीक्षा






यांच्या स्वरूपाची झालेली चर्चा. याची लहानशी सुरुवात विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'विद्वत्त्व व कवित्व' या 'निबंधमाले'तील निबंधाने करून दिली होती. केशवसुतांनी आपल्या कवितातूनच प्रतिभा, काव्यनिर्मिती याबद्दलचे अनुभवाचे विचार मांडले होते. राजवाड्यांचा 'कादंबरी' हा १९०८ सालचा निबंध त्यातील विचारांच्या भरारीमुळे आजही वाचकाला दिपवून टाकतो. ह. ना. आपट्यांनी 'विदग्धवाङ्मय' या शीर्षकाखाली मुंबई विद्यापीठात व्याख्याने देऊन उत्तम साहित्याची लक्षणे कोणती त्याचा ऊहापोह केला. न. चिं. केळकरांची 'सविकल्पसमाधी' ही संकल्पना व वा. म. जोशी यांनी त्या संकल्पनेची केलेली चिकित्सा ही देखील या विषयातील महत्त्वाची पायरी होती.

या आढाव्यावरून दिसून येईल की, १८५७ साली मुंबई विद्यापीठाची स्थापना झाल्यापासून स्वातंत्र्य मिळेपर्यंतच्या ९० वर्षांत मराठीतील विचारविश्व निरनिराळ्या विद्याशाखांच्या अभ्यासाने व विविध विचार-प्रणालींच्या प्रवर्तनाने गजबजून गेले होते. प्रतिभाशाली अभ्यासकांनी ज्ञानाची नवनवीन क्षेत्रे मराठी समाजाला खुली करून दिली होती. असे असले तरी याच काळात पा चात्त्य जगातील विचारवंतांनी एकूण मानवी ज्ञानक्षेत्राचा जो अटोकविकट विस्तार झापाट्याने चालवला होता त्याच्याशी तुलना करता मराठीचे विचारक्षेत्र किती तोकडे होते हे इतिहासाचार्य राजवाड्यांनी १९१२ साली 'महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद' या निबंधात परखडपणे दाखवून दिले होते. त्यांनी जिथे कोणाही मराठी पंडिताने प्रवेश केला नव्हता अशा ज्ञानदालनांची भली मोठी यादीच त्या निबंधात दिली आहे.

इथे आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की, ज्या लेखांचा व ग्रंथांचा उल्लेख केला आहे ते ग्रंथ वा लेख निर्दोष किंवा परिपूर्ण होते असे मी म्हणत नाही. पण त्यातील विचारांची झेप, अभ्यासाचा कस, विविध संकल्पनांचे केलेले सूक्ष्म विश्लेषण आणि या सर्वांचा घातलेला पीळदार मेळ लक्षणीय, असाधारण व प्रभाव पाडणारा होता हे अधोरेखित करावयाचे आहे. आजही हे ग्रंथ वा लेख वाचताना त्यातील त्रुटी व व्यंगे जाणवली तरी आपण जे वाचत आहोत ते आपल्याला उन्नत करत आहे असा अनुभव आल्याखेरीज राहात नाही.

(४)

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सर्वांस आकृष्ट करणारे सामाईक उद्दिष्ट राहिले नाही. उपदेशकाला कोणत्याही विचारांचा वा कृतीचा उपदेश करायचा असो, हा विचार अगर कृती स्वातंत्र्य मिळवण्याला मदत करणारी आहे, अशी प्रस्तावना विवेचनाला जोडली की, श्रोते/वाचक आकृष्ट होत. आपण पाहिले की, स्वातंत्र्यापूर्वी गांधीवाद, समाजवाद, साम्यवाद व हिंदुत्व या विचारप्रणाली महाराष्ट्रात जोमाने वावरत होत्या. त्यापैकी गांधीवाद वगळला तर इतर विचारप्रणालींच्या प्रस्तुततेची कसोटी स्वातंत्र्यानंतरच लागावयाची होती. म्हणजे सरकारच्या कारभारात या विचार-प्रणालींच्या उपयोग कसा केला जातो, हे ठरणार होते.

स्वातंत्र्यानंतर देशाने स्वतःला 'लोकशाही प्रजासत्ताक' म्हणून घोषित केले. त्यामुळे निवडणुकांद्वारे सत्तेवर येण्याची संधी सर्व नागरिकांना तत्त्वतः मिळाली. परंतु प्रत्यक्षात नागरिकापर्यंत ही संधी पोचवण्यासाठी निरनिराळे पक्ष स्थापण्यात आले. समाजवाद्यांनी काँग्रेसपासून वेगळे होऊन स्वतःचा पक्ष काढला. साम्यवाद्यांना 'लोकशाही प्रजासत्ताक' ही संकल्पना त्यांच्या संप्रदायाला सोडून आहे, असे वाटत होते. पण १९५४ साली त्यांनी लोकशाही राज्यपद्धती – घटना बदलण्याचा पर्याय राखून-स्वीकारली. त्यांचा पक्ष किंवा संप्रदाय कधी काँग्रेसमध्ये तर कधी बाहेरून काम करीत होताच. ब्रिटिशांनी काँग्रेसकडे सत्ता सोपवली होती. त्या पक्षाने कोणत्याच विचारसरणीशी स्वतःला बांधून घेतले नव्हते. 'प्रजाहितार्थ राज्य चालवणे' हेच त्या पक्षाने स्वतःचे उद्दिष्ट ठरवले होते. सत्ताकांक्षा हा गांधीवादाला पूर्णपणे त्याज्य असल्याने तो संप्रदाय राजकीय पक्ष म्हणून काम करणे शक्यच नव्हते.

खरी अडचण हिंदुत्ववादी संप्रदायाची झाली. स्वातंत्र्यापूर्वी त्यांचे कार्य, काँग्रेसने मुसलमानांना सवलती देण्याचे मान्य करून हिंदूच्या हिताला बाधा पोचवू नये यासाठी हिंदूंना जागृत ठेवण्याचे होते. हे काम हिंदुमहासभा हा पक्ष काढून ते करत होते. स्वातंत्र्या बरोबरच फाळणी झाली व पाकिस्तानातून हिंदू निर्वासित मोठ्या संख्येने भारतात आले. त्या वेळी हिंदुत्ववादी सांगू लागले की,









आम्ही दाखवून दिलेले धोके प्रत्यक्षात उतरत आहेत व आमची प्रस्तुतता प्रकर्षाने ध्यानात येत आहे. खरे तर हिंदुत्ववादी केवळ हिंदुमहासभेतच होते, असे नव्हे. त्या विचारप्रणालीशी जवळीक दाखवणारे अनेकजण काँग्रेस पक्षातही होते. या वेळी जर गांधीजींचा दुर्दैवी खून झाला नसता तर, कदाचित्, काँग्रेसमधील हिंदुत्ववादी हिंदु-महासभेकडे आलेही असते. गांधीहत्येचे संकट आल्यानंतर हिंदुत्ववाद्यांना स्वतःची विचारप्रणाली व तिच्याशी निष्ठा ठेवणारे अनुयायी यांची पुनर्घटना करावी लागली व त्यात पुढची पंचवीस वर्षे गेली.

कोणत्याही विचारप्रणालीशी निष्ठा राखून कार्य करणारा जो संप्रदाय असतो त्या संप्रदायाला आपल्या कामात सुसूत्रता राहावी यासाठी प्रशिक्षित कार्यकर्त्यांचा केंद्रस्थानीय गट स्थापन करावा लागतो. संप्रदायाला प्रतिकूल परिस्थिती निर्माण झाली तरी संप्रदाय संघटित ठेवण्याचे काम हा केंद्रस्थानीय गट करतो. स्वातंत्र्यपूर्व काळात काँग्रेस ही एक आणि एकमेव चळवळ होती. तिला अशा गटाची जरूर भासली नाही. सरकारने पक्षावर बंदी घातली, तरी चळवळ लोकांच्या पाठिंब्याने कमी-अधिक प्रमाणात चालत राहायची. साम्यवादीपक्षाने अशी प्रशिक्षित कार्यकर्त्यांची चमू जाणीवपूर्वक तयार केली होती. समाजवादीपक्षाने 'राष्ट्रसेवादला'च्या माध्यमातून आणि अभ्यासवर्ग चालवून असे प्रशिक्षित कार्यकर्ते व त्यांची संघटना घडवण्याचा प्रयत्न केला. त्याचप्रमाणे सांप्रदायिक नियतकालिके चालवून आपले अनुयायी इमानदार राहावेत, काही संशय/शंका उद्भवल्याच तर त्यांचे निराकरण व्हावे, स्पर्धक संप्रदायाच्या विचार-प्रणालीला उत्तरे दिली जावीत अशी व्यवस्था करण्याची खटपट केली.

'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' ही हिंदुत्वनिष्ठ संघटना असली तरी राजकीय पक्ष नव्हता. त्या काळचा हिंदुत्वनिष्ठ पक्ष हिंदुमहासभा हा होता. हा पक्ष व 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' यांचे नाते काय होते, याविषयी नाना मते होती. एवढे नक्की की, रा. स्व. संघ हा हिंदुमहासभेच्या राजकीय संघर्षाची जबाबदारी घेत नव्हता. गांधीहत्येनंतर हिंदुत्ववाद्यांवर राजकीय संकट कोसळले. एक म्हणजे रा. स्व. संघावर बंदी आली व दुसरे, हिंदुमहासभा हा पक्ष वाळीत पडला. अशा वेळी अपकर्षाकडे जाणा-या हिंदुमहासभेला तारण्याची खटपट न करता हिंदुत्वनिष्ठ संप्रदायाला जनसंघाच्या रूपाने नवा राजकीय पक्ष देण्याचे काम संघाने केले व त्याही स्थितीत आपण सत्ताकांक्षी राजकीय पक्ष नाही, हे स्पष्ट केले.

सारांश १९७५ साली काँग्रेस सरकारने आणीबाणीची घोषणा केली तेव्हा जे तीन संप्रदाय काँग्रेसला विरोध करणारे होते त्यातील साम्यवादी व समाजवादी संप्रदायातील लोकांनी केव्हा ना केव्हा काँग्रेसला साथ दिली होती. (साम्यवाद्यांपैकी काही नामवंत काँग्रेसच्या मंत्रिमंडळात होते आणि समाजवाद्यांतील विचारवंतांनी काँग्रेसशी अर्थपूर्ण संवाद साधला होता.) खुद्द काँग्रेस पक्ष विचारप्रणालीवर आधारलेला कधी नव्हताच व आता तर तो व्यक्तिनिष्ठ झाला होता.

आणीबाणीत पहिल्या प्रथम बंदी रा. स्व. संघावर घालण्यात आली. ती बंदी घालून काँग्रेसने हे घोषित केले की, कोणत्या संप्रदायाला आपण सर्वात धोकादायक मानतो, साम्यवादी व समाजवादी पक्षांच्या कार्यकर्त्यांना अटक झाली खरी; पण ती नैमित्तिक होती. तत्त्वसंघर्षामुळे केलेली नव्हती. आणीबाणीनंतर हिंदुत्ववादी संप्रदाय अधिकाधिक सामर्थ्यशाली होत गेला, असे म्हणावे लागते; मग भलेही त्या संप्रदायाची राजकीय शाखा जी 'भारतीय जनता पक्ष' त्याच्या संसदेतील/विधिमंडळातील निर्वाचित प्रतिनीधींच्या संख्येत काहीही वधघट झालेली असो.

एकोणीसशे नव्वद सालाच्या सुमाराला समाजवादी व साम्यवादी संप्रदायाचे राजकीय पक्ष महाराष्ट्रातून संपुष्टात आले. पण संप्रदाय म्हणून त्यांचे अस्तित्व काही प्रमाणात उरले. आपणास माहीत आहे की, समाजवाद्यांना साम्यवादाची मूळ तत्त्वे मान्य होती. त्यांचा विरोध सशस्त्र साम्यवादी क्रांतीला होता. सनदशीर मार्गाने आपण साम्यवादी तत्त्वज्ञानावर आधारित राज्य क्रमाक्रमाने अंमलात आणू शकतो असा त्यांचा विश्वास होता. पण नव्वद सालाच्या आसपास स्वतःला साम्यवादी म्हणवून घेणा-या (क्यूबा व चीन वगळता) सर्व देशातील राजवटी कोसळल्या व तेथे लोकशाही व भांडवलशाही यांना वाव देणारी सरकारे स्थापिली गेली. चीनने लोकशाही स्वीकारली नाही; पण भांडवलशाही मार्गाने आर्थिक

विकास घडवण्याचे ठरवले. परिणाम असा झाला की, साम्यवादातील तत्त्वांचा अवलंब करून सुबत्ता आणता येत नाही असे वैचारिक वातावरण पसरले.

असे असले तरी साम्यवाद हा विचारसरणी म्हणून पराभूत झाला असे मानले जायला काही कारण नव्हते. असे म्हणायला वाव होता की, स्वतःला साम्यवादी म्हणवणा-या राजवटी साम्यवादाचे प्रामाणिक अवलंबन करत नव्हत्या; त्या देशातील साम्यवादी पक्षांनी बदलत्या परिस्थितीचे भान ठेवून धोरणे आखायला हवी होती. पराभव झाला तो साम्यवादाचा नसून त्या देशातील राज्यकर्त्यांचा पराभव झाला आणि तसे म्हटले गेलेही. असाही दावा करता येण्याजोगा होता की, साम्यवादी सरकारे गेली तरी प्रश्नांचे आकलन करून घेण्यासाठी साम्यवादी विचारपद्धतीचा संदर्भचौकट म्हणून उपयोग होऊ शकतो.

पण साम्यवादी सरकारांची उलथा-पालथ झाल्यानंतर लगोलगच जागतिकीकरण, उदारीकरण व खाजगीकरण या धोरणांचा 'आर्थिक सुधारणा' या नावाखाली पुकारा केला जाऊ लागला. त्या काळात देशाची आर्थिक स्थिती निराशापूर्ण होती. त्या वेळच्या काँग्रेस सरकारने ही धोरणे स्वीकारली. साम्यवादीच नव्हे तर हिंदुत्ववादी संप्रदायानेही या धोरणांना विरोध केला. पण तो केवळ आपले वेगळेपण दिसावे एवढ्यासाठीच होता. कारण, नंतर आलेल्या सरकारात कधी साम्यवादी संप्रदायाचे तर कधी हिंदुत्ववादी विचारांचे प्रतिनिधी होते तरी त्यांनी ही धोरणे चालूच ठेवली.

खरे सांगायचे तर विसाव्या शतकाच्या शेवटाला विज्ञान व तंत्रज्ञान यांच्या झपाट्याने झालेल्या प्रगतीमुळे साम्यवाद ज्या गृहीतांवर बसवलेला होता, ती गृहीते कालबाह्य झाली व त्या विचारप्रणालीच्या आधाराने सा-या प्रश्नांचे आकलन होते आणि उत्तरे मिळतात हा विश्वास वाटेनासा झाला होता. हिंदुत्व ही प्रणाली अशी आहे की, तिच्या केंद्रस्थानी असणारा आग्रह वगळता ती इतर कोणत्याही बाबतीत तडजोडीला किंवा बदलाला तयार असते. केंद्रस्थानी असलेला आग्रह असा की, या देशात हिंदू परंपरा, हिंदुधर्म व हिंदुसमाज म्हणून काही आहे व त्याला डावलून इथले सरकार कोणताही निर्णय घेऊ शकणार नाही. पण या संप्रदायाची राजकीय शाखा जो भारतीय जनता पक्ष तो हा आग्रहदेखील संधी येईपर्यंत निलंबित ठेवण्याइतका सुज्ञ आहे, असे दिसते.

(५)

पाचव्या कलमातील विस्तृत विवेचन करावे लागले याचे कारण अनेक जाणत्या लोकांनी मराठीतील वैचारिक लेखन सुमार होते आहे अशी जी तक्रार केली आहे तिचा उलगडा व्हावा. माझ्या लिहिण्याचा रोख असा आहे की, वैचारिक लेखनाचे ढोबळपणे दोन भाग पाडता येतील : एक, आवाहनात्मक व उपदेशकी वैचारिक लेखन व दोन, विवेचक व विश्लेषणात्मक लेखन. स्वातंत्र्यपूर्वकाळात या दोन्ही प्रकारांचे वैचारिक लेखन चालत होते; पण 'स्वातंत्र्य' हे सर्वसमावेशक उद्दिष्ट सतत नजरेपुढे असल्याने पहिल्या प्रकारच्या लेखनाला वैचारिक लिखाण समजण्याकडे समाजाचा कल राहिला.

स्वातंत्र्याच्या उंबरठ्यावर असताना चार वेगवेगळ्या विचारप्रणालीच्या आधाराने समाजापुढील समस्यांचे आकलन केले जाऊ लागले. स्वातंत्र्यानंतरही या विचारप्रणालींना मानणारे संप्रदाय निर्माण झाले व सांप्रदायिक चष्म्यातून प्रश्नांकडे पहाण्याची सवय, आवाहनात्मक लिखाण करणा-या वृत्तपत्रीय व नियतकालिकीय लेखकांनी स्वतःला लावून घेतली. मात्र विसाव्या शतकाच्या शेवटाला परिस्थिती इतक्या झपाट्याने बदलली की, वैचारिक क्षेत्रात आघाडीला असणारी साम्यवादी विचारप्रणाली मोठ्या प्रमाणात आपली विश्वासार्हता गमावून बसली. त्याच वेळी हिंदुत्त्वाशी निष्ठा बाळगणारा संप्रदाय – मुख्यतः त्याची राजकीय शाखा जो भारतीय जनता पक्ष हा सामर्थ्यशाली व लोकप्रिय होत गेला. आता तर तो एकट्याच्या बळावर केंद्रस्थानी आणि राज्यातही सत्तेवर आला आहे.

तक्रार करणा-यांच्या अस्वस्थतेचे मूळ हे या, त्यांच्या दृष्टीने विपरित परिस्थितीत आहे. हिंदुत्ववादी विचार-प्रणाली, वर म्हटल्याप्रमाणे, अतिशय लवचिक आणि गमखाऊ आहे. तिला विरोध करून किंवा त्या विचारसरणीतील दोष किंवा अंतर्विरोध दाखवून काही बौद्धिक व सांप्रदायिक समाधान लाभले, तरी परिस्थिती बदलणार नाही. साम्यवादी संप्रदायाने म्हणा – किंवा










हिंदुत्वाविरोधी संप्रदायाने म्हणा – हिंदुत्वाचा विरोध करणे अंमल बाजूला ठेवून आपण या कोंडीत कसे सापडलो याचा अंतर्मुख होऊन विचार केला तर चालू तकादीला काही गोमटे फळ येईल.

दुसरे असे की, विवेचक व विश्लेषणात्मक असे जे वैचारिक लिखाण मराठीत होत आहे, त्याला 'सुमार' म्हणता येणार नाही. ज्ञानाच्या नव्या नव्या क्षेत्रात मराठी विचारवंत प्रवेश करीत आहेत. मनोरंजन व मनोरंजनाची माध्यमे यांचा अभ्यास करणारे, शेती व शेतीचे अर्थकारण यांच्या निरनिराळ्या अंगांविषयी विधायक विचार करणारे, विज्ञान व तंत्रज्ञान यांतील प्रगतीची माहिती देणारे अशा अनेक त-हांचे वैचारिक लेखन मराठीत होत आहे. त्यातील लक्षणीय पुस्तकांची नावे द्यावीत याचे इथे प्रयोजन नाही.

सारांश, 'वैचारिक लेखन सुमार होते आहे' या तक्रारीचे मूळ वैचारिक लेखन म्हणजे आवाहनात्मक किंवा उपदेशपर लिखाण हा एकांगी दृष्टिकोन ठेवण्यात आला आहे. काही ऐतिहासिक कारणामुळे हा दृष्टिकोन प्रचलित झाला आहे. अशा प्रकारच्या वैचारिक लेखनाचे पुरस्कर्ते जे साम्यवादी संप्रदायाचे लोक त्यांच्या कुंठित अवस्थेमुळे आलेल्या नैराश्यातून ही तक्रार आली आहे. हा दृष्टिकोन सोडून जर आपण विश्लेषक व विवेचन लेखन हे, आवाहनात्मक किंवा उपदेशपर नसले तरीही, वरच्या दर्जाचे व कसदार असू शकते, असे मान्य केले तर मराठीत आज व पूर्वीही उत्तम दर्जाचे वैचारिक लेखन होत होते व आहे, असे कळून येईल.



---



अनुक्रमणिका








# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक - १८

श्री. के. वनपाल

आपल्या जवळ जे काही आहे त्याविषयी असंतुष्ट राहण्याचा माणसाचा स्वभाव आहे. आहे त्या पेक्षा काहीतरी निराळं त्याला हवं असतं. बंगला असला तर, इथे जरा एकाकी वाटतं; त्यापेक्षा फ्लॅटमध्ये राहाणं चांगलं. आजूबाजूला माणसं असतात आणि सुरक्षित वाटतं! अशी कुरकूर. फ्लॅट असले तर तक्रार की, घ्या. चाळीत राह्यल्या सारखं वाटतं उगीच शेजा-या-पाजा-यांचा राबता! बंगला असता, तर कसं छान झालं असतं!

असंच आमच्या भाऊसाहेबांचं आणि वहिनीसाहेबांचं झालं. दोघे अगदी सुखात होती. मुंबईत, चांगल्या वस्तीत मोठा फ्लॅट होता. सगळ्या सोयी हात जोडून उभ्या होत्या. एक मुलगा आणि एक मुलगी अमेरिकेत होते. दुसरी मुलगी पुण्याच्या उपनगरात होती. काही कमी नव्हतं. तब्बेती चांगल्या होत्या; मिळकत भरपूर होती. मुंबईत दोघेच होते.

मात्र हे सुख वहिनीसाहेबांच्या अंगी लागत नव्हतं. त्यांची भाऊसाहेबांमागे एकच भुणभूण; "आपण एक शेत घेऊ; त्यात फार्म हाऊस बांधू. मुंबई पासून दूर असलं तरी हरकत नाही. आपल्या इनोव्हातनं जाता येईल. आपलं हिरवंगार शेत, मोटेतून पाटात पडणारं झुळझूळ पाणी, वाहता वारा आणि शिवारातला भाजीपाला!" सांगता सांगता वहिनीबाई हरखून जात.

बाई काही गृहिणी नव्हत्या. त्या खूप शिकल्या होत्या आणि इन्कमटॅक्स, सेल्स टॅक्स अशा कटकटीच्या गोष्टीत सल्लामसलत देत उत्तम पैसा आजही मिळवत होत्या. भाऊसाहेब महसूल खात्यात नोकरीला होते. निवडणूक विभागात त्यांनी बरीच वर्षे काढली होती. आता निवृत्त. फार्म हाऊस, शेती या गोष्टी या वयात जमणार नाहीत याची त्यांना जाणीव होती. वहिनीसाहेबास त्यांनी समजावण्याचा प्रयत्नही केला होता. पण स्त्री हट्टापुढे काय चालणार?

(१)

शेवटी त्यांनी महसूल खात्यातील त्यांचा घनिष्ट मित्र ज्या जिल्ह्यात नोकरीत होता तिथे जाऊन चौकशी करायचे ठरवले. रावसाहेब अद्याप कचेरीत आले नव्हते म्हणून तिथल्या अव्वल कारकुनाशी बोलत बसले.

"सर, तुमची व रावसाहेबांची निवडणुकीच्या काळातली मैत्री, म्हणून त्यांना भेटायला आलात का?" अव्वल कारकुनाने विचारलं.

"हो, पण आणखी एक काम होतं."– भाऊसाहेब.

"मला कल्पना दिलीत तर संबंधित कारकुनाला सांगून तयारीत ठेवतो."– अ. का.

"काम खाजगीच आहे. पण तुम्हीही रेव्हेन्यूतलेच आहात; तेव्हा सांगायला हरकत नाही. इकडे एखादा जमिनीचा तुकडा घ्यावा असा माझा व बायकोचा विचार आहे. तुमच्या पाहाण्यात असेल, एखादं बागायती शेत. रावसाहेबांशी मी बोलेनच. पण तुमची माहिती अधिक खात्रीशीर, म्हणून सांगून ठेवलं."– भाऊसाहेब.

"वा! चांगली कल्पना आहे. असली माहिती आमच्याकडे असतेच. माझ्या खात्रीतला एक एजंट आहे. तुमचं काम हमखास करून देईल."— अं. का.

"असं! मग बोलवा ना त्याला!" — भाऊसाहेब.

"इतक्या तातडीनं?"

"अहो, वेळ कशाला? शुभस्य शीघ्रम्."— भाऊसाहेब.

"ठीक आहे, लावतो फोन."— अं. का.

अव्वल कारकुनाने एजंटाशी बोलणं केलं. दोन तासात एजंट येणार होता. भाऊसाहेबांना थांबवून ठेवा, असं त्यानं अ. का. ला सांगितलं होतं.

भाऊसाहेब थांबायला तयारच होते. सुरुवात तर चांगली झाली होती. इतक्यात रावसाहेब आले. अ.

अनुक्रमणिका

का. ने भाऊसाहेबांना रावसाहेबांकडे पाठवले. 'परत जाताना मला भेटाच', असे सांगायला तो विसरला नाही.

"वा, वा, भाऊसाहेब, अलभ्य लाभ," रावसाहेब म्हणाले, पण आत्ता इकडे कुठे? सध्या तर काही निवडणुकीचा हंगाम नाही.

"नाही, रावसाहेब, आत्ता मी रिटायर्ड आहे. खाजगी कामासाठी आलो. तुमची मोलाची मदत लागणार आहे."

"अहो भाऊसाहेब, तुमचं खाजगी काम मी माझंच समजतो. सांगा काय ते."

भाऊसाहेबांनी आपलं काम काय ते समजावून सांगितलं. आपलं अ. का. शी झालेलं बोलणं ही सांगितलं.

"काही काळजी करू नका, भाऊसाहेब. अ. का. काय करतो ते पाहू, नाही तर मी आहेच!" रावसाहेबांनी आश्वासन दिले. चहा-पाणी झालं आणि भाऊसाहेबांनी निरोप घेतला.

तोवर अ. का. पाशी एजंट येऊन बसलाच होता. ओळखदेख झाली. शेत पाहायला केव्हा जायचं हा विषय निघाला.

"असं करू", भाऊसाहेब म्हणाले, "उद्या जाऊ त्या खेड्याला. किती लांब आहे?"

"साधारण चाळीस कि. मी. वर आहे. तासाभराचा रस्ता. जमीन छान आहे नि परवडणा-या दरातली आहे." -एजंट.

(२)

भल्या सकाळी एजंटाबरोबर भाऊसाहेब, एजंटाच्या गाडीतून, खेड्याला जायला निघाले. वाटेत एजंटाने सांगितले, "एकरी दहा लाख रुपये म्हणतोय तो शेतकरी. करू आपण घासाघीस. तुम्हाला पाच एकर जागा हवीय; हा तुकडा ६ एकर तीन गुंठ्यांचा आहे. बघू तिथे गेल्यावर. जमिनीत विहीर आहे आणि तो शेतकरी ऊस लावतोय. म्हणजे बागयतही होईल. थोडा पडीक भाग आहे. पण तो सपाट करून लागवडीखाली आणू. तुम्हाला आवडेल असं रान आहे म्हणून दाखवतोय. नाहीतर दुसरी जागा बघू."

भाऊसाहेबांच्या डोळ्यासमोर हिरव्याकंच शेतीचं स्वप्न तरळायला लागलं. वहिनीसाहेबांना हवं तसं शिवार मिळणार या आनंदात भाऊसाहेब मशगूल झाले.

गंमत अशी की, भाऊसाहेबांची माहिती कळल्या-पासूनच एजंट त्या शेतक-याच्या संपर्कात होता. एजंटाला कळलं होतं की, विहीरीचं पाणी तळाला गेलं होतं. हिवाळ्यात ही स्थिती तर उन्हाळ्यात काय होणार, ही शेतक-याला चिंता आणि सौदा कसा जमवायचा ही एजंटाला फिकीर. एजंटानं शेतक-याला कालच सुचवलं होतं की ४-६ टँकर पाणी विहीरीत आणून ओता. ऊस, पाण्याअभावी वाळलेला होता. तेव्हा ठरलं की, गडी आजारी असल्यानं पाणी धरता आलं नाही! 'असं सांगायचं.'

एजंटानं असं ही सुचवलं की, दर दहा लाखाचा सांगायचा पण ९ लाखाचा सौदा करायचा. पुढे असंही ठरलं की, भाऊसाहेब व एजंट शेतावर पोचतील तेव्हा शेतमालकानं तिथं हजर राहायचं नाही. 'शेत विकायला आपण फार उत्सुक नाही, हे दाखवायची ही युक्ती आहे. मी (एजंट) सगळं रान फिरून दाखवीन. शेताचे चांगले 'पॉइंट्स' ध्यानात आणून देईन. मगच तुम्ही (शेतकरी) शेतावर यायचं.'

सकाळी १०।। वा. एजंटाची गाडी शेतावर आली. एजेटानं भाऊसाहेबांना पहिल्यांदा विहीरीपाशी नेले. मोट, नाडा, सौंदर, दोरासाठीचं चाक असं सगळं जिथल्या तिथं होत. शेतक-याने एजंटाच्या सल्ल्यावरून रात्रीच सगळी व्यवस्था केली होती. विहीरीजवळ एक कडब्याच्या छताचं खोपट होतं खोपटात एक मोठा पाण्याचा माठ आणि शेतीची अवजारं गोठवून ठेवली होती. बाहेर दोन सरळ शिंगांच्या खिलारी बैलांची देखणी जोडी बांधून ठेवली होती. एक गाय, तिचं वासरू, एक-दोन शेळ्या अशी जनावरं उभी होती. देखावा असा होता की, सधन शेतक-याच्या खात्यापित्या घराचा हा बारदाना आहे.

एजंटानं तिथं असलेल्या गड्याला 'मालकाना बोलावता का?' असं विचारलं. गडी म्हणाला, "बैलासनी आधी पाणी पाजतो नि मग जातो", असं सांगितलं. अर्धा तास बैलांना पाणी देण्यात गेला. तोपर्यंत एजंटानं भाऊसाहेबांना सारं रान फिरून दाखवलं. शेताच्या चतुःसीमा समजावून दिल्या. दोघं तापून झोपडीत आले. एजंटानं डे-यातलं थंडगार पाणी भाऊसाहेबांना दिलं.

इतक्यात एक-दोन शेतकरी बरोबर घेऊन मालक



अनुक्रमणिका

झोपडीतं आला. आल्याबरोबर त्यानं एजंटाला विचारलं, "एका एकी कसं येणं केलं?"

"आता काय सांगावं? हे भाऊसाहेब काल आमच्या रावसाहेबांकडे आले. त्यांना चांगली चालती शेतजमीन विकत घ्यायची आहे. रावसाहेबांनी हुकूमच काढला, म्हणा की, की यांना सोईची जमीन दाखवा. तुमची जमीन नजरेपुढे होतीच. म्हणून इथे घेऊन आलो. तुम्हाला कळवायला सवडच कुठे होती, हो! काल हे रावसाहेबांकडे आले अन् आज सकाळीच इकडे आलो, बघा!"

"हां, म्हंजी मागं जमीन विकायचा विचार होता माझा, अन् तुम्हाला म्हटलं बी होतं तसं. पण आता विचार बदललाय माझा. किंमती वाढतायत न्हवं. म्हटलं बाजाराचा अंदाज घेऊन मगच विकावी. थांबलो थोड."

"असं का हो? म्हणजे हेलपाटाच झाला की, हा. मीच फोन करायला हवा होता." – एजंट.

"अवं, फोन बी काई उपयोगाचा न्हायी. आमच्या नातीनं परवाच तो या पाण्याच्या माठात टाकला, बगा! अन् गेली खेळायला. पोरच ती."

"मग बरंच झालं, म्हणा की. शेत पाहून तरी झालं. तुम्ही आता विकायचं नाही म्हणताय न्हवं. पुनः येऊ कवा तरी. मात्र विकायचं ठरविलंत तर आम्हाला कळवा बरं, पहिल्यांदा."

सगळी सामसूम झाली. एजंटानं चेहरा पाडला. भाऊसाहेब थिजूनच गेल्यासारखे बसले. तेव्हा मालकासंगं आलेला एक पोक्त शेतकरी पुढे झाला. म्हणाला, 'अरं लेका गणपा, असं तोडून टाकल्यागत बोलतोस व्हयं? अरं, ही दारी आलेली लक्ष्मी बी असंल! सा मयनं थांबलास, तर तवा काय भाव असंल, हे काय माहीत? तु तुझा अंदाज सांग. मग भाऊसाहेब व्हय म्हणतील नाय तर नाय म्हणतील!'

भाऊसाहेब थोडे खुलले. एजंटही थोडा सावरला.

"आबा, तुमचं म्हणणं बरूबर हाय....पन"– मालक.

"पन न्हायी नि बिन न्हायी. झडाझडा बोल. आढवेढं कशा पायी घेतूसं?"– आबा.

"अवं, काय हाय की, मागं एकरी ८-९ लाखाचा भाव मनात धरून आला असाल, तर एकरामागे मला दोन लाखाचा घाटा येनार का न्हाय? म्हणून म्हनलं की, सध्या जमीन इकायचा इचारच नगं, म्हनून."– मालक.

"म्हंजी इकायची तर हाय अन् उगाच आभाळाकडं पघतुयास व्हय; पाऊस पडल का न्हायी, म्हनून?– आबा."

आबांच्या बोलण्यानं बैठकीचा नूरच बदलला. बोलणी चांगलीच रंगली. दोन तास चालली. दोन्ही बाजू आपापला दावा रेटत होत्या. शेवटी, एजंटानं आधीचं ठरवल्याप्रमाणं ९ लाखाची बोली पक्की झाली.

"मग, हे ठरलं ना?" भाऊसाहेबांनी विचारलं.

"म्हणजे काय, ठरलंच की?" एजंट म्हणाला.

मालकाने ही होकार भरला. इसाराने, बिनपावतीचे रु. २०,००० भाऊसाहेबांनी काढून दिले. वरच्या तीन गुंठ्यांचं काही घ्यायचं नाही हे मालकाने कबूल केले. बैठक उलगडली.

भाऊसाहेब आणि एजंट माघारी चालले. वाटेत भाऊसाहेबांनी वहिनीसाहेबांना फोन लावला.

"हॅलो, सरस्वती मिळाली बरं का, तुला हवी तशी जमीन! आपण ५ एकर म्हणत होतो, पण जरा मोठीच म्हणजे ६ एकर ३ गुंठे आहे. भावही बराच म्हणायचा, म्हणजे एकराला ९ लाख आहे. पाणी आहे, विहीर आहे, मोट, नाडा, सगळं-सगळं व्यवस्थित आहे. नक्की आवडेल तुला! खरेदी खताची तारीख ठरवतो आणि उरकून टाकू हे काम. त्या वेळेला तुलाही यावं लागेल. काय?" — भाऊसाहेब.

"अहो, मी कशाला पाहिजे खरेदीखताला? तुम्ही नीट करालच की सगळं, विहीर, पाणी, पाट आहे ना? पाटाचं पाणी पायावर घेता येत ना? मला ती हौस आहे. सगळं कसं डोळ्यापुढं तरळतंय. लवकर या. फोटो काढलेच असतील, ते द्या व्हॉट्स ॲप वर पाठवून."

फोटो काढायचं राहूनच गेलं होतं. आता त्यावरून बोलणी खावी लागणार होती. पण ते नेहमीचंच होतं.

भाऊसाहेब परत आले. फोटोवरून थोड वाजलेच. पण भाऊसाहेबांनी सारं चित्र उभं केलं वहिनीसाहेब हरखून गेल्या.

(३)

वहिनीसाहेब काही खरेदीखताच्या वेळी गेल्याच

नाहीत. भाऊसाहेब, त्यांचे मित्र रावसाहेब, अव्वल कारकून, एजंट असं सगळे शेतावर केले. खुद्द रावसाहेबच उपस्थित असल्याने काही अडचणी आल्या नाहीत. सगळी कागदपत्रं भाऊसाहेबांच्या हाती पडली. मालकानं गोडा-धोडाचं जेवण केलं. रावसाहेब अन् भाऊसाहेब दोघेही शाकाहारी; त्यामुळं कोंबडी-मटनाचा सवालच नव्हता.

आठ दिवसांनी भाऊसाहेब अन् वहिनीबाई शेतावर गेल्या. विहीरीचे पाणी खूपच खोल गेलं होतं. गणपा (मालक) म्हणाला की, शेजा-यानं उसाला पाणी देण्यासाठी मोट लावली होती, म्हणून पाणी खोल गेल. येईल दोन-चार दिवसात वर. भाऊसाहेबांच्या मनात पाल चुकचुकली – पण आता उपाय नव्हता.

एजंटाच्या मध्यस्थीनं असं ठरलं की, वर्ष-दोन वर्ष गणपानंच शेतीची मशागत करायची. तेवढ्या काळात चढावरची एकर-दोन एकर जमीन पडीक होती. तिचं सपाटीकरण करायचं. म्हणजे सलग पीक घेता येईल. खर्च भाऊसाहेबांनी करायचा आणि गणपान ट्रॉलीज्, जेसीबी वगैरे मिळवून द्यायचं. एकदा सारी जमीन वहिवाटीला आली की, गणपानंच ती अर्धेलीनं कसायची. पहिल्या वेळचा बी-बियाणं, खतं, औषधं हा खर्च भाऊसाहेबांनी करायचा. संध्याकाळी भाऊसाहेब व वहिनीबाई मुंबईला परतले.

आता भाऊसाहेबांना शेतीचा ध्यास लागला. आधुनिक शेती करून 'शेतीनिष्ठ' ही पदवी मिळवण्याची स्वप्नं ते पाहू लागले. त्यांनी जिल्ह्याच्या ठिकाणी एक फ्लॅट भाड्याने घेतला व ते तिथेच राहू लागले. रोज शेतावर जाऊ लागले.

भाऊसाहेबांना वाटलं, आपण घाई-घाईत शेत खरेदी केलं खरं; पण त्याची मोजणी करून घेतली नाही. मग त्यांनी 'तात्काळ' या सदरात, जास्तीचे पैसे भरून, तालुक्याच्या मोजणी ऑफिसात अर्ज भरला. रावसाहेबांचा वाशीला लावून ८ दिवसात मोजणी होईल अशी तरतूद केली. मोजणीदार मूळ मालक गणपा आणि भाऊसाहेब शेतावर हजर झाले. मोजणीदाराला पूर्वी झालेल्या मोजणीच्या काही खुणाच सापडेनात. तलाठ्याच्या मदतीनं त्यानं संध्याकाळपर्यंत मोजणी उरकली.

आता आणखी एक गफलत निघाली. जमिनीला लागून एक बंधारा होता. तो जमिनीतल्या १८ गुंठ्यांवर बांधला होता. बहात्तरच्या दुष्काळातलं हे काम. ७/१२ वर त्याची नोंद नव्हती. पण मोजणीदाराकडील फाळणी-बारात नोंद होती. ही १८ गुंठे जमीन आता सरकारची; कारण बंधारा दुष्काळी कामातून, म्हणजे सरकारच्या खर्चातून बांधला होता. भाऊसाहेबांच्या जमिनीतून हे १८ गुंठे वगळावे लागणार. हा एक दणकाच म्हणायचा. खरेदीखताच्या अगोदरच्या ३० वर्षांच्या नोंदींची माहिती न घेतल्याचा हा परिणाम. मोजणी न करता खरेदी खत केले हाही मूर्खपणाच! ठीक आहे. झालं ते झालं. ४५०००/- रुपयांची जमीन गेली!

आता पडीक जमिनीचं सपाटीकरण. गणपानं इकडून तिकडून यंत्रसामग्री भाड्यानं आणून जमीन सपाट करून घेतली. भाऊसाहेब रोजच्या रोज खर्चाचे पैसे देत होते. ४।। लाखाचा खर्च आला! कारण काही ठिकाणी खडक लागल्यानं तेथे सुरूंग वापरावा लागला! पण सारी जमीन एका पातळीवर आणि सुटसुटीत झाल्यानं भाऊसाहेबांना समाधान वाटलं. इथपर्यंत हिवाळा संपत आला होता.

आता खरीपासाठी पावसाची वाट पाहू. पिकाचं नियोजन करू असा. विचार झाला. उन्हाळ्यात गणपानं सारी जमीन नांगरून घेतली. खर्च, अर्थातच भाऊसाहेबांचा, पावसाच्या अगोदर सुरूचा ऊस लावायचं ठरलं. विहीरीच्या पाण्याचं खरं नाही, हे दोघांनाही कळत होतं. पण गणपा ऊसा लावू म्हणतोय तर लावू दे त्याला ऊस असा विचार करून भाऊसाहेब स्वस्थ राहिले. बाकी भागात खरिपाची पारंपारिक पिकं म्हणजे हायब्रीड, ज्वारी, थोडी बाजरी, मूग, चवळी, घेवडा यांची लावणी झाली.

गणपा हुषार. त्यानं दुष्काळी कामातून बांधलेल्या बंधा-या जवळचा खड्डा मोठा व खोल करून त्यात पाणी साठवण्याची व्यवस्था केली. तिथलं काही पाणी विहिरीत पाझरेल असा चर खणला. नंतर त्यानं धाडसानं ४ एकरात ऊस लावला. आता एकरी किती टन ऊस येतोय ते फक्त पाहायचं.

आतापर्यंत खरेदी खताचा खर्च, सपाटीकरणाचा खर्च, पहिल्या लावणीचा खर्च मिळून ६३ लाख रुपये खर्च आला होता. ते सगळं बाजूला ठेवून भाऊसाहेब उसाच्या उत्पन्नाकडे डोळे लावून बसले।

(४)

उसाची कापणी होऊन ऊस कारखान्याकडे गेला. एकूण ऊस २०० टन झाला. पण मूळ मालकाने (गणपा) आपल्या नावावर १४० टन ऊस दाखवून पैसे उचलले आणि भाऊसाहेबांच्या नावावर फक्त ६० टन ऊस! आता गणपाला विचारायचं काय आणि बोलायचं तरी कसं.

रानातल्या झोपडीत, तोटा आला तरी किती याचा हिशेब मांडत भाऊसाहेब बसले आहेत. इतक्यात एक गोरटेला, तरणाबांड पोरगा झोपडी पाशी आला. "राम राम, साहेब, झकास केलंया की रान! ऊस-बी गेला म्हनं"— पोरगा.

"तुमचा परिचय? — भाऊसाहेब."

"मी इथलाच. पण आता मुंबईत असतो. गावाकडं टाकतो फेरी, मधून मधून!"

"तुम्ही म्हनं ९ लाख रुपये एकरानं जमीन घेतली, खरं का?" तो पोरगा पुढं म्हणाला.

"तुम्हाला कसं कळलं!"

"अवं, इतक्या गाजावाजानं व्यवहार झाला, तो कळल्याखेरीज -हातो व्हय?"

"खरं हो; पण तुम्हाला काय म्हणायचय?"

"काय राव तुमचं शहरी वागणं? अवं चवकशी तरी करायची. आज, या वक्ताला, इथला भाव ६ लाख आहे. तुमी त्या एजंटा बरुबर आला अन् बावरातलंच सगळा व्यवहार पुरा केला. तुमी तलाठ्याला, सर्कल साहेबाला विचारलं असतं तर बरं झालं असतं. पण तुमी एक राव सायबास्नीच घेऊन आलात! मग तलाठी अन् सर्कल कश्याला काय बोलतील? तो एजंट छप्पन्न टिकल्यांचा अन् तुम्ही भोळे। ते १८ गुंठे रान गेल्याचं बी कळलंच सगळं. चावडीपुढे तोच विषय चालतो न्हवं. जाऊ द्या. झालं ते झालं म्हनायचं अन् गप -हायाचं."

वा एवढंच ऐकायचं राहयलं होतं. भाऊसाहेबांचं डोकं सुन्न झालं. हिशेबाचे कागद त्यांच्याकडे बघून फडफडायला लागले! त्यांच्यावर दगड ठेवता ठेवता भाऊसाहेब आपल्या मनावरही दगड ठेवत होते. सगळं मिळून आतापर्यंतचा खर्च ६३ लाख आणि पदरात फक्त ६० टनांच्या उसाचं बिल! तेही हातात नाहीच.

भाऊसाहेब मला भेटायला आले तेव्हा त्यांनी स्वतःच सांगितलेली हकीकत.

टीपः "शेती, शेतकरी व शासन" ही लेखमाला इथे संपली.



# "मराठी साहित्यातील लक्ष्मी आणि सरस्वती"

विनायक गंधे

लक्ष्मीबाई टिळक आणि बहिणाबाई चौधरी ही मराठी साहित्यातील दोन सुपरिचित नावे. मराठी वाचकांच्या कायम लक्षात राहाणारी. लक्ष्मीबाई म्हणजे स्मृतिचित्रे आणि बहिणाबाई म्हणजे त्यांची अवीट गाणी असे समीकरण मराठी वाचकांच्या मनात तयार झाले आहे. या दोघींचे वाङ्मयीन कतत्व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात घडले. या दोघींचा कालखंड समानच आहे. लक्ष्मीबाईंचा जन्म १८६८ मध्ये झाला तर बहिणाबाईंचा १८८० मध्ये. लक्ष्मीबाईंचे निधन १९३६ मध्ये झाले तर बहिणाबाईंचे १९५१ मध्ये. पण दोघींच्या व्यक्तिमत्त्वात अनेक समान धागे आढळतात आणि त्याहीपेक्षा दोघींच्या साहित्यनिर्मितीत अनेक समान गुणविशेष आढळतात.

लक्ष्मीबाईंना संसारात पडेपर्यंत अक्षरओळख नव्हती; तर बहिणाबाई पूर्णपणे निरक्षर होत्या. पण या दोघींनी जी साहित्यनिर्मिती केली ती मराठी साहित्यात अपूर्व ठरली. लक्ष्मीबाईंनी 'स्मृतिचित्रे' लिहून मराठीत 'आत्मचरित्र' लेखनाचा मानदंड निर्माण केला तर बहिणाबाईंनी अहिराणी सारख्या बोलीभाषेत रसोत्कट आणि हृदयंगम कविता लिहिली.

लक्ष्मीबाई आणि बहिणाबाई या दोघीही सामान्य संसारी स्त्रिया, कष्टाचे खडतर आयुष्य जगलेल्या. त्यांच्या जीवनात सुखापेक्षा दुःखाचे प्रसंग अधिक आले. पण या दोघींनी ही दुःखाचा स्वागतशील मनाने स्वीकार केला. दोघींमध्ये दुःखाला हसण्याचे सामर्थ्य होते. दोघींनीही आपल्या दुःखाकडे ताटस्थ्याने पाहिले. जीवनातील विसंगती टिपण्याची तरल विनोदबुद्धी लक्ष्मीबाई आणि बहिणाबाई या दोघींच्याही ठायी होती.

आधुनिक मराठी साहित्याच्या कालखंडातील त्यांची साहित्यनिर्मिती; पण या दोघींच्या लेखनावर तत्कालीन साहित्याचा कोणताही प्रभाव जाणवत नाही. म्हणजे त्यांची साहित्यनिर्मिती खास त्यांची आहे. एक तर बहिणाबाई निरक्षर होत्या. त्यांना मध्यवर्ती साहित्याची कल्पना असणे शक्य नाही. त्यांचे सारे आयुष्य खेड्यात आणि शेतीकामात गेले. लक्ष्मीबाईंची परिस्थिती थोडी वेगळी आहे. त्यांना उशिरा अक्षरओळख झाली असली तरी रे. टिळकांमुळे त्यांच्या घरात वाङ्मयीन वातावरण होते. बालकवी ठोंबरे त्यांच्या घरी काही काळ वास्तव्यास होते. या गोष्टींचा लक्ष्मीबाईंच्या साहित्यनिर्मितीस लाभ झाला असणार यात शंका नाही. रे. टिकांप्रमाणे लक्ष्मीबाईंनी विविध प्रसंगांच्या निमित्ताने कविता केल्या. हे सर्व खरे असले तरी दोघींच्या मनावर साहित्यप्रकारांचे, साहित्यरचनेचे, पूर्वसूरींच्या लेखनाचे काही दडपण असण्याचे कारण नव्हते. या दोघींनीही जे लिहिले ते उस्फूर्त, कुठल्याही अनुकरणाशिवाय आणि कुठल्याही दडपणाशिवाय. केवळ आपल्याच अंतःकरणाला साक्ष ठेवून. त्यांच्या अंतःकरणातून स्वाभाविकपणे जे प्रकटले तेच कलात्मक झाले.

बहिणाबाई चौधरी यांच्या कविता मराठी रसिकांसमोर आणण्याचे श्रेय आचार्य अत्रे यांना जाते. लक्ष्मीबाई टिळकांच्या साहित्याचा जाहीर गौरव आचार्य अत्रे यांनीच केला. लक्ष्मीबाई आणि बहिणाबाई या दोघींचे साहित्य आजही रसिकांना आस्वाद्य वाटते. या दोघींच्या साहित्यावर आजही विविध कार्यक्रम सादर होताना दिसतात. लक्ष्मीबाईंची स्मृतिचित्रे रंगभूमीवर एकपात्री नाट्यातून सादर केली गेली आहेत. तसेच बहिणाबाईंच्या गाण्यांचेही वेगवेगळ्या कलाकारांकडून सादरीकरण झाले आहे.

लक्ष्मीबाई टिळकांची 'स्मृतिचित्रे' हा मराठी साहित्यातील एक मानबिंदू. वास्तविक 'स्मृतिचित्रे' म्हणजे एका सामान्य स्त्रीने सांगितलेली असामान्य संसारकथा आहे. स्मृतिचित्रामागील लक्ष्मीबाईंचा हेतू आपल्या पतीचे म्हणजे रेव्हरंड टिळक यांचे चरित्र लिहिणे हा होता. टिळकांच्या आज्ञेनुसार जसे घडले तसे त्यांना सांगावयाचे होते. स्मृतिचित्रे हे जसे रेव्ह. ना. वा. टिळक यांचे चरित्र आहे तसे ते लक्ष्मीबाईंचे आत्मचरित्र आहे टिळक आणि लक्ष्मीबाई यांच्या संसाराचे आणि सहजीवनाचे

अनुक्रमणिका






चित्र आहे. आपल्या पतीचे यथातथ्य चित्र रंगविता रंगविता त्या स्वतःचेही सहजसुंदर चित्र रेखाटून गेल्या आहेत. स्मृतिचित्रे ही एक व्यापक कुटुंबकथा आहे. लक्ष्मीबाईंच्या अंगभूत सामर्थ्याने स्मृतिचित्रांना ललित साहित्याची रोचकता प्राप्त झाली आहे.

लक्ष्मीबाईंनी सांगितलेल्या घटना, रंगविलेले प्रसंग उभ्या केलेल्या व्यक्तिरेखा या विशिष्ट काळातील आणि परिस्थितीतील असल्या तरी लक्ष्मीबाईंच्या असाधारण अभिव्यक्तीने या लेखनाला सुंदर रूप प्राप्त झाले आहे. 'स्मृतिचित्रां'तील काळ सुमारे शंभर वर्षांपूर्वीचा आहे. विशिष्ट काळातील विशिष्ट परिस्थितीचे चित्रण असले तरी लक्ष्मीबाईंच्या प्रतिभाशक्तीने या लेखनाला कलात्मक रूप आले आहे. तत्कालीन जीवन, विशिष्ट वातावरण, तत्कालीन प्रश्न या गोष्टींची चौकट येथे नाहीशी झाली आहे आणि 'स्मृतिचित्रे' हे मानवी प्रवृत्तींचे आणि माणसांच्या भावभावनांचे चित्र बनले आहे.

'स्मृतिचित्रे' साकारणारे लक्ष्मीबाईंचे व्यक्तिमत्त्व बहुरंगी आहे. ते स्वागतशील आहे. जीवनोत्सुक आहे. त्यांच्या जीवनात आश्चर्यकारक स्थित्यंतरे दिसतात. मनी गोखले ते रेव्हरंड लक्ष्मीबाई टिळक हे त्यांच्या जीवनातील स्थित्यंतर विलक्षण आहे. लहानपण कर्मठ घरात आणि नाना गोखले या वडिलांच्या जाचात गेले असले तरी बालपणीच्या या वातावरणाने लक्ष्मीबाईंची क्रिडाशील वृत्ती कोमेजून गेली नाही. लक्ष्मीबाईंमधील उत्साहाचा आणि चैतन्याचा झरा पुढील आयुष्यात कधी आटला नाही. बाहुल्या खेळणे, गाणी म्हणणे, गोष्टी ऐकणे आणि सांगणे, रांगोळ्या घालणे. हे बालपणीचे छंद त्या प्रौढपणीही करत राहिल्या. शैशव जपल्याच्या खुणा स्मृतिचित्रात अनेक ठिकाणी आहेत. खेळकर दृष्टीने लक्ष्मीबाईंनी आपल्या संसाराकडे आणि जगाकडे पाहिले. त्यामुळेच जीवनात आलेल्या वादळांनी, खडतर प्रसंगांनी त्या खचून गेल्या नाहीत. ('स्मृतिचित्रे') अवघड, दुःखद प्रसंगांकडे ताटस्थाने पाहू शकल्या. आपले गतजीवन सांगताना "काय मौज होती" असाच त्यांचा सूर राहिलर. खरी चेंडूसारखी त्यांची वृत्ती सुखदुःखाचे अनुभव घेताना त्यांना निश्चितच उपयोगी पडली असणार. आपल्या मनाबद्दल त्यांनी लिहिले आहे की, "शरीराचा त्याग करण्याचे प्रसंग मजवर कितीतरी वेळा आले असतील पण तो मी कधीच केला नाही - - - - माझ्या मनाची ठेवण अशी आहे की, सर्व निराशामय अंधकारातून चाचपडत धडपडत का होईना पण आपला मार्ग आक्रमायचा. थोडक्यात म्हणजे रबरी चेंडूप्रमाणे आहे माझे" (स्मृति १९३).

लक्ष्मीबाईंच्या या वृत्तीचा प्रत्यय त्यांच्या सर्वच जीवनातून येतो. विशेषः त्यांच्या आयुष्यातील उत्तरार्धात याचा आधिक प्रत्यय येतो.

कुठलाही आडपडदा न ठेवता लक्ष्मीबाईंनी आपल्या पतीचे म्हणजे रेव्हरंड टिळकांचे चित्र रेखाटले. सत्याचा अपलाप न करता. पण त्याचबरोबर त्यांनी स्वतःचे नकळतपणे चित्र रेखाटले. ते सहजसुंदर आणि कलात्मक आहे. आपले चरित्र लिहिताना 'इदं न मम' अशीच त्यांची भावना आहे. स्वतःकडे त्या निर्ममतेने पाहू शकतात. आत्मकथनात येणारा 'मी'चा वावर किंवा अहंभाव त्यांच्या लेखनात डोकावत नाही. आपण जसे आहोत किंवा होतो तसे प्रकट होण्यात त्यांना आनंद वाटतो. 'स्व'ची यथार्थ जाणीव लक्ष्मीबाईंना होती. त्यांना माणसांची पारख होतीच पण इतरांना ओळखण्यापेक्षा त्या स्वतःला अधिक ओळखत होत्या. ना. वा. टिळकांच्या मानाने दिसायला सामान्य असलेल्या लक्ष्मीबाईंनी स्वतःचे सुंदर चित्र उभे केले आहे. ".....नाव लक्ष्मीबाई, अवतार लंकेच्या पार्वतीचा, फाटके लुगडे, नाकात बारीकसे सुंकले, हातात टिळकांचे नाव मोठ्या अक्षरात लिहिलेली बॅग. (स्मृति १५८) एखाद्या प्रसंगातील आपली फजिती किंवा हास्यास्पद अवस्था त्या मोकळेपणाने सांगतात. 'कशी गंमत झाली' अशीच त्यांची दृष्टी असते."

लक्ष्मीबाईंनी मी कोण, कशी होते आणि कशी बदलत गेले, याचा सर्वांगसुंदर शोध स्मृतिचित्रांतून घेतला आहे. कर्मठ सनातनी घराण्यात बालपण गेलेल्या निरक्षर लक्ष्मीबाई टिळकांशी विवाह केल्यानंतर साक्षर होतात, इंग्रजी माणसांसमोर भाषण करतात, इतकेच नव्हे तर धर्मांतर करतात, टिळकांचा गुण लागून उत्कृष्ट कविता करतात. तसेच रेव्ह. टिळकांचे अपुरे राहिलेले 'ख्रिस्तायन' हे खंडकाव्य पुरे करतात. हा त्यांचा सारा प्रवास आचंबित करणारा आहे. रेव्ह. टिळकांबरोबर लक्ष्मीबाईंनी केलेला हा संतपदाकडे जाणारा प्रवास होता. आपल्या सा-या

अनुभवांचे निखळ रूप लक्ष्मीबाई, स्मृतिचित्रात मोठ्या निर्ममतेने मांडतात.

स्मृतिचित्राची प्रेरणा आपले पती कवी रेव्ह. टिळक यांचे चरित्र लिहिणे ही आहे. टिळकांबद्दल लक्ष्मीबाईंच्या मनात कृतज्ञतेचा भाव आहे. आपण घडलो ते टिळकांमुळे याची त्यांना जाण आहे. टिळकांची इच्छा प्रमाण मानून जे सत्य होते तेच लिहायचा आणि जसे घडले तसे लिहायचा लक्ष्मीबाईंनी प्रयत्न केला. आपल्या लेखनात लक्ष्मीबाईंनी टिळकांना विभूतिमत्त्व दिले नाही किंवा त्यांचा अकारण गौरव केला नाही. टिळकांच्या मोठेपणाचे दडपणही त्यांच्या मनावर आलेले दिसत नाही. गुणदोष असणारा एक माणेस त्यांनी स्वच्छ दृष्टीने टिळकांचे चित्रण केले आहे.

वयाच्या अकराव्या वर्षी लक्ष्मीबाईंनी टिळकांच्या आयुष्यात प्रवेश केला. प्रारंभापासूनच टिळकांच्या लहरीपणाचा व विक्षिप्तपणाचा अनुभव त्यांना येत गेला. टिळकांच्या शीघ्रकोपी स्वभावाचे आणि लगेच सर्वकाही विसरून जाणा-या स्वभावाचे प्रत्यंतरही त्यांना वारंवार येई. टिळकांनी आपल्याला साक्षरतेचा पहिला धडा कसा दिला, याचे मोठे नाट्यपूर्ण चित्रण लक्ष्मीबाईंनी केले आहे. सहजीवनात अनेक वेळा टिळकांनी लहरीपणा केला, घराचा त्याग केला, न सांगता अनेकदा निघून गेले. पश्चात्तापही केला. टिळकांच्या या सा-या गोष्टी मनात कोणताही विषाद न ठेवता कटुता न ठेवता लक्ष्मीबाई सांगतात. लक्ष्मीबाईंनी काडी काडी जमवून संसार उभा करावा आणि टिळकांनी तो उधळून टाकावा. गोरगरीबांना वाटून टाकावा, असे अनेकदा घडले, हळूहळू लक्ष्मीबाईंची मनःस्थिती 'ना खंत ना खेद' अशी झाली. टिळकांच्या बरोबर प्रारंभीच्या काळात कसे अवघड गेले, यासंदर्भात लक्ष्मीबाईंची मार्मिक टिप्पणी आहे. डेक्कन क्वीनच्या मागे एखादा खटारा बांधला व ती आपल्या पूर्ण वेगात निघाली म्हणजे त्या खटा-याची जी आदळआपट होईल ती माझी होत असे. (स्मृति. पृ. ४४९) पण लक्ष्मीबाईंच्या स्वभावात एवढे स्थित्यंतर झाले की, संतपदाकडे त्यांची वाटचाल एवढ्या वेगाने सुरू झाली की, 'तू तर माझ्याही पुढे गेलीस!" (स्मृति. २५६) असे टिळकांनी उद्गार काढले. मात्र आपल्या दोघांच्या परोपकारी वृत्तीचा कुठलाही बडेजाव न करता लक्ष्मीबाई मिस्किल भाष्य करतात, "कोणी चालत, असेल तर त्याला उचलून कडेवर घेण्याची आम्हाला सवयच होती." (स्मृति. ३०३).

'स्मृतिचित्रे' ही केवळ ना. वा. टिळक आणि लक्ष्मीबाई टिळक यांच्या सहजीवनाची कहाणी नाही; ती व्यापक होत गेलेली एक कुटुंबकथा आहे. संसारात पदार्पण केल्यानंतर कितीतरी व्यक्ती लक्ष्मीबाईंच्या जीवनात आल्या. टिळकांच्या परोपकारी वृत्तीमुळे त्यांचा गोतावळा वाढत गेला. आपल्या मुलांबरोबर अनेक अनाथ गरीब मुले त्यांनी संभाळली. त्यांना अनेक मानसपुत्र आणि मानसकन्या लाभल्या. प्राप्ती तुटपुंजी आणि घरातील खाणारी तोंडे अनेक, असे प्रसंग त्यांच्या संसारात वारंवार आले. पण कोंड्याचा मांडा करून लक्ष्मीबाईंनी आला दिवस साजरा केला. भिन्न विचारांची माणसे लक्ष्मीबाईंच्या घरात गुण्यागोविंदानो राहिली. लक्ष्मीबाईंचे प्रेम त्या सगळ्यांना मिळाले. त्यांच्या घराचे वर्णन त्यांच्या शब्दात "येत्याचे घर व जात्याचे दार" असे होते. आपल्या संसाराबद्दलचा लक्ष्मीबाईंचा अभिप्राय खूप बोलका आहे. त्या म्हणतात, "आमचे बि-हाड कोठूनही हलले की , ते बि-हाड म्हणजे आम्ही माणसेच तेवढी हलत असू. सामानसुमान जिथल्या तिथे शेजा-यापाजा-यांना अर्पण करण्यात येत असे. वडिल नाना गोखले, सासरे, बहिण भिकूताई, पेंडसे, बालकवी डॉ. ह्यूम अशा आपल्या जीवनात महत्त्वाचे स्थान असलेल्या कितीतरी व्यक्तिंचे सर्वांगीण दर्शन लक्ष्मीबाईंनी स्मृतिचित्रात घडविले आहे. या आणि इतर अनेक व्यक्तिंच्या संदर्भातील प्रत्यक्ष अनुभव लक्ष्मीबाई आपल्या संपन्न शब्दसंपदेने आपल्यापुढे दृश्य रूपात उभा करतात. स्मृतिचित्रांमध्ये लक्ष्मीबाईंनी विविध नातेसंबंध माणसामाणसामधील ताणतणाव आणि पीळ अतिशय प्रत्ययकारी पद्धतीने मांडले आहेत. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे लक्ष्मीबाईंनी ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर त्यांच्या आप्तेष्ट मंडळींची झालेली अवस्था! 'धर्मांतर' या एका गोष्टीने नातेवाईकांच्या मनात झालेली उलथापालथ लक्ष्मीबाईंनी जशी अनुभवली तशी शब्दबद्ध केली आहे. जसे घडले तसेच लक्ष्मीबाईंना सर्वकाही सांगावयाचे असते. त्यांच्या कथनात स्वसमर्थन नसते, कैफियत नसते किंवा आत्मगौरवही नसतो.

अनुक्रमणिका






टिळकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर नातेवाईकांच्या समवेत लक्ष्मीबाई आणि टिळकांची देवळात झालेली भेट आणि त्या वेळी दोघात झालेले संभाषण यादृष्टीने पाहण्यासारखे आहे. त्यामुळे स्मृतिचित्रांना एक निरागस रूप प्राप्त झाले आहे."

लक्ष्मीबाईंची 'स्मृतिचित्रे' वाचताना कुठेच रुक्षतेचा किंवा कंटाळवाणेपणाचा अनुभव येत नाही. एखाद्या कादंबरीचा विस्तीर्ण पट अनुभवावा, असा 'स्मृतिचित्रांचा' प्रत्यय येतो. ललित साहित्याचे नावीन्य त्याला प्राप्त होते. स्थळकाळाचे आणि व्यक्तिंचे संदर्भ गळून पडून एखाद्या कलाकृतीची नित्यनूतनता स्मृतिचित्रांना लाभते. गोष्टी वेल्हाळ लक्ष्मीबाई घटना प्रसंगांचे केवळ निवेदन करीत नाहीत तर ते ते प्रसंग साक्षात करतात. स्मृतिचित्रे वाचताना त्या घटना, ते प्रसंग आपण अनुभवतो. त्या काळातील माणसे चैतन्यपूर्ण होऊन आपल्याभोवती वावरतात, असे वाटते. बालकवी ठोंबरे यांचे लक्ष्मीबाईंनी रेखाटलेले व्यक्तिचित्र अतिशय लोभस आहे. आपल्या मुलांप्रमाणेच त्या बालकवींकडे पाहातात. बालकवींबद्दल लक्ष्मीबाईंच्या मनात विशेष स्थान आहे. लक्ष्मीबाई म्हणतात, "आमच्या घरी नाना प्रकारची माणसे आली आणि गेली पण ठोंब-यांसारखे कोणीच नाही." (स्मृति. ३७६).

लक्ष्मीबाईंचे लेखन अनलंकृत आहे, त्यात पांडित्याचा आव नाही, कृत्रिमता नाही. छोट्या छोट्या वाक्यातून प्रसंग उभा करण्याची त्यांची हातोटी विलक्षण आहे. उदा., "उपकरणी होती तांब्याची, पाणी विहीरीचे, राख लाकडाची व दिवस पावसाचे" (स्मृति. ४९) आपल्या निरक्षर बायकोला शिकविताना टिळकांनी लक्ष्मीबाईंना शब्द म्हणजे काय, हा विचारलेला प्रश्न आणि त्यातून पुढे निर्माण झालेले नाट्य अतिशय गमतीदार आहे. टिळकांचा उंदीर मारण्याचा प्रयोगही लक्ष्मीबाई असाच मिस्किलपणे सांगतात. धर्मांतरामुळे आधी रेव्ह. टिळकांच्या आणि नंतर लक्ष्मीबाईंच्या जीवनात जे नाट्य निर्माण झाले ते लक्ष्मीबाई आपल्यापुढे उलगडतात. त्यातून सहजपणे मानवी प्रवृत्तींचे दर्शन घडते. लक्ष्मीबाईंच्या धर्मांतरामुळे त्यांच्या धाकट्या जावेपुढे वेगळाच प्रश्न निर्माण झाला होता, तो म्हणजे "आता मालीच्या लग्नात मी कोणाला नमस्कार करू?" (स्मृति. २१५)
(लक्ष्मीबाईंना अनुभवातील नाट्य असे सहजपणे सापडते.)

लक्ष्मीबाईंकडे अभिजात विनोदबुद्धी आहे. त्यामुळे आपल्या कटू अनुभवांकडे त्या खेळकर दृष्टीने पाहू शकतात. त्यांनी म्हटले आहे "महाबळेश्वरची हवा मानवली असली तरी फक्त शरीराला व मनालाच. सामानाला नाही. इतके ते रोडावले होते." (स्मृति २३५) किंवा "माझा जातिभेद व सोवळेओवळे महाबळेश्वरीच हवा खात पडले होते." (स्मृति. २३८) धर्मान्तरानंतर त्यांना स्वच्छतागृहात जायला जेव्हा बंदी केली गेली तेव्हाचे लक्ष्मीबाईंचे उद्गार आहेत "पायखाने कर्मठ झाले" (स्मृति. २२०)

त्यांच्या ठायी असलेल्या क्रिडाशील वृत्तीने शब्दांचे सुंदर खेळ केले आहेत. उदा., "मामांचा क्रोधाग्नी विझला खरा पण आत्याबाईंची वीज कडकडावयाची होती ती कडाडलीच." (स्मृति. ३८) किंवा "त्यांच्या गुळगुळीत डोक्याची मधल्या तुळतुळीत कंदिलाशी गाठ पडून दोन्हींचा मोक्ष झाला." (स्मृति. २५४) रेव्ह. टिळकांबद्दल एके ठिकाणी त्यांनी लिहिले, "सभा असो, साप असो, साहेब असो. त्यांना कधी भय वाटले नाही." (स्मृति. ३६३) कथनाच्या ओघात लक्ष्मीबाई सहज म्हणींची रचना करून जातात. उदा., "चालतील वाह्या तर विचारतील आयाबाया" किंवा "माणसाने दिलेले पुरत नाही व देवाने दिलेले सरत नाही." (स्मृति २१९)

लक्ष्मीबाईंची स्मृतिचित्रे एवढी गुणसंपन्न आहेत की, ती वाचताना हे लेखन चरित्र आहे की, आत्मचरित्र आहे याचा आपल्याला विसर पडतो. लक्ष्मीबाईंनी यात जे वैविध्यपूर्ण जग उभे केले आहे. जी अनेकविध स्वभावाची माणसे रंगविली आहेत. त्यामुळे हे लेखन एक नवनिर्मिती झाले आहे. स्मृतिचित्रे वाचताना आपल्याला स्थलकालाचा विसर पडतो. स्मृतिचित्रांच्या वाङ्मयीन गुणवत्तेमुळे मराठी गद्यवाङ्मयातील ती श्रेष्ठ कलाकृती ठरली आहे.

मराठी गद्याचे वैभव जसे स्मृतिचित्रात दिसते तसे मराठी काव्याचे वैभव बहिणाबाई चौधरी यांच्या कवितेत दिसते. बहिणाबाई चौधरी या खानदेशातील शेतकरी कुटुंबातील एक अशिक्षित स्त्री. अत्यंत सामान्य आयुष्य त्यांच्या वाट्याला आले होते. वैधव्यानंतर ते अधिकच

खडतर झाले. पण बहिणाबाईंनी या आयुष्याचे स्वागत करून त्यात सौंदर्य पाहिले आणि या सौंदर्याचा कवितेतून आविष्कार केला. आपल्या वेदनेला त्यांनी शब्दरूप दिले.

बहिणाबाईंच्या अत्यंत मिताक्षरी, सूत्रबद्ध आखीव, रेखीव कविता वाचताना आश्चर्य वाटते. कारण बहिणाबाई निरक्षर होत्या. त्यांना लिहिता वाचता येत नव्हते. जात्यावर बसल्यावर, घरकाम करताना, शेतात राबताना त्यांना गाणी सुचायची. आपले गाणे कसे उस्फूर्त असते ते बहिणाबाईंनी आपल्या कवितेतून सांगितले आहे.

अरे घरोटा घरोटा तुझ्यातून पडे पीठी
तसं तसं माझं गानं पोटातून येतं व्होटी

बहिणाबाई गुणगुणत राहायच्या, गाणे म्हणत राहायच्या. त्यांचे सुपुत्र कविवर्य सोपानदेव चौधरी यांनी आईची गाणी त्या त्या प्रसंगी लिहून ठेवली. त्यामुळे मराठी रसिकांना ती उपलब्ध झाली. हे मराठी रसिकांचे केवढे सुदैव ! सोपानदेवांच्या कानावर न पडलेली बहिणाबाईंची किती तरी गाणी हवेत विरून गेली असतील. तरीसुद्धा आज जे बहिणाबाईंचे काव्य उपलब्ध आहे ते कितीतरी समृद्ध आहे. बहिणाबाईंच्या या गाण्यांच्या बंदिस्तपणाचे, रचनेच्या डौलाचे, त्यातील अंतर्गत संगीताचे आणि संपन्न शब्दकळेचे आश्चर्य वाटते. कारण सर्वसाधारणपणे कवी स्फूर्तीच्या आवेगात कविता लिहितो हे खरे; पण त्यात तो शब्दांचा फेरफार करतो. रचनेत बदल करतो. कविता मनासारखी उतरेपर्यंत परिष्करण करतो. "शब्दांनो मागुते या " अशी कविकुलगुरू केशवसुतांनी केलेली विनवणी सर्वश्रुत आहे. प्रतिभावंत कवींनाही परिष्करणाची गरज वाटते. पण या गोष्टी बहिणाबाईंना लागू नव्हत्या. कारण त्यांच्या सगळ्या कविता या मौखिक रचना आहेत. त्यांची गाणी हा उस्फूर्त आविष्कार होता. त्यात परिष्करणाला स्थान नव्हते. बहिणाबाई हर्षामर्षाच्या प्रसंगी, ऊन पावसाच्या प्रसंगी आपल्या अंतर्यामीचे व्यक्त करून गेल्या. त्यात त्यांना बदल करणे शक्य नव्हते. आपल्या गाण्यांचा त्यांना पुनःपुन्हा विचारही करता आला नसेल त्यामुळे त्यांच्या या आगळ्या वेगळ्या प्रतिभेचे अधिकच आश्चर्य वाटते. बहिणाबाईंची तरल सौंदर्यदृष्टी, त्यांचे तत्त्वचिंतन, मानवी जीवनावर त्यांनी केलेले भाष्य, मनोव्यापारांचे त्याचे सखोल ज्ञान. या सा-यांमुळे बहिणाबाईंची कविता समृद्ध झाली आहे, बहिणाबाईंची गाणी प्रासंगिक नाहीत तर या गाण्यांमधून कालातीत शाश्वत भावना व्यक्त झाल्या आहेत. हा नुसताच स्फूर्तीचा आवेग नव्हता. बहिणाबाईंच्या या उत्कट आविष्काराला चिंतनाची जोड होती.

बहिणाबाईंना आधुनिक मराठीतील पहिल्या निसर्ग कवयित्री म्हणता येईल. आधुनिक मराठी कविता ज्या काळात अनेकांगांनी बहरून आली त्याच काळात बहिणाबाई आपली गाणी म्हणत होत्या. केशवसुत, बालकवी गोविंदाग्रज यासारखे कवी ज्या काळात कविता लिहित होते त्याच काळात खानदेशातील एका खेडेगावात बहिणाबाई उस्फूर्तपणे गाणी म्हणत होत्या. आपल्या गाण्यांतून त्या निसर्गाशी सुखसंवाद करीत होत्या. त्यांची गाणी सृजनाचा महोत्सव साजरा करीत होती. ही गाणी निर्मितीची स्तोत्रे गात होती. बहिणाबाई अनिमिष नेत्रांनी निसर्गातील सृजनाचे चक्र पाहात होत्या. निसर्गविभ्रमांनी हरखून जात होत्या.

मन माझं हरखलं पानं झाडाची हालली
वारा आला रे झन्नाट्या झाडं झुडपं डोलली

बीज अंकुरल्याचे त्यांना केवढे कौतुक आहे.

बीज टराई भुईत सर्वे कोंब आले व-हे
गह्यरलं शेत जसं आंगावरती शहारे

आपली तरल संवेदना बहिणाबाईंनी नेमक्या शब्दात पकडली आहे. पाऊस हा तर सगळ्याच कविजनांचा आवडता विषय. पावसाची विविध रूपे कलावंतांना नेहमीच साद घालतात. बहिणाबाईंचा पाऊस असा आहे.

देवा पाऊस पाऊस। तुझ्या डोळ्यातले आस
देवा तुझा रे हारास। जीवा तुझी रे मिरास

निसर्गविषयक गाण्यातून बहिणाबाईंचे मातृहृदय व्यक्त झाले आहे. धरित्रीमातेच्या उदात्त प्रेमाबद्दल त्या म्हणतात,

जशी धरित्रीची माया अरे तिला नाही सीमा
दुनियेचे सर्व पोट तिच्यामध्ये झाले जमा

मोटेच्या खळाळत्या पाण्यात बहिणाबाईंना पाळण्यातल्या तान्ह्या बाळाच्या निरागस क्रिडा दिसतात. पेरलेल्या बी-बियाणाकडे त्या मातेच्या वत्सल नजरेतून पाहातात. पेरलेले बी बियाणे त्यांना आईच्या कुशीत झोपलेल्या बाळासारखे वाटते. वर पसरलेली माती म्हणजे






प्रेमाची शालच. सुगरणीचे घरटे त्यांना निरपेक्ष मातृप्रेमाचे प्रतीक वाटते. तो केवळ पिलांसाठी झोका नसतो तर त्या पिलांमध्ये अवघे सर्वस्व अडकलेल्या सुगरणीने आपला जीवच तेथे टांगलेला असतो. ज्या वेळी बालकवी बालविहंगाला उद्देशून म्हणतात, "शिकवी रे शिकवी माते दिव्य तुझी असली गीते" अशी आळवणी करीत होते त्या वेळी शेतात काम करताना बहिणाबाई सुगरणीच्या खोप्याचे कौतुक करताना माणसाला उद्देशून म्हणतात,

"पाखराची कारागिरी जरा देख रे मानसा" पुढे माणसाला, त्याच्या कर्तृत्वाला आवाहन करतात. "तुला देले रे देवानं दोन हात दहा बोटं."

बहिणाबाईंच्या खडतर आणि दुःखमय आयुष्यात 'माहेर' हा एक हळवा कोपरा आहे. 'माहेर'विषयक कवितांमधून त्यांनी सासुरवाशिणीचे कातर आणि आतूर मन प्रकट मन प्रकट केले आहे. त्यातून स्त्रीमनाची भावनिक आंदोलने प्रकटली आहेत. कोणत्याही सासुरवाशिणीचे आपल्या माहेरावर उत्कट प्रेम असते. तिची माहेरची ओढ कधी संपत नाही. माहेरच्या लहानसहान आठवणीने ती मोहरून जाते. माहेरच्या निरोपात ती उल्हासित होते. बहिणाबाईही त्यांच्या आयुष्यात अशा भावावस्थेतून गेल्या असणार, यात शंका नाही. आपल्या मनाची ही भावोत्कट स्पंदने त्यांनी शब्दबद्ध केली आहेत.

माझ्या माहेराच्या वाटे जरी आले पायी फोड
पाय चालले चालले अशी माहेराची ओढ

आपल्या आईचे हृद्य चित्र बहिणाबाईंनी रेखाटले आहे.

माय भीमाई माऊली जशी आंब्याची साऊली
आम्हाईले केले गार सोता उन्हात तावली

ही आई त्यागमूर्ती आहे, वात्सल्यमूर्ती आहे. बहिणाबाईंनी हे गुणविशेष हृद्य शब्दात मांडले आहेत. त्या म्हणतात,

"लेकीच्या माहेरासाठी मायसासरी नांदते"

आईच्या ममतेने त्यांनी बालयोगिनी मुक्ताईचे हृदयस्पर्शी चित्र उभे केले आहे. ह्या दहा वर्षाच्या लेकराने लिहिलेले ताटीचे अभंग बहिणाबाईंच्या शब्दात असे आहेत.

घेती हिरीदाचा ठाव ऐका ताटीचे अभंग
एका एका अभंगात उभा केला पांडुरंग

बहिणाबाईंची प्रकृती मूलतः तत्त्वचिंतकाची आहे. त्यामुळे त्यांच्या भावोत्कट कविता तत्त्वचिंतनाच्या पातळीवर जातात. त्यातून सहजपणे भावसत्य प्रकट होते. त्यांची कविता जीवनभाष्य बनते. आपल्या परिचित जगातील गोष्टींमधून, नित्य व्यवहारातून, निसर्गातील प्रतिमांमधून त्यांचे चिंतन प्रकट होते. साध्या विषयातून बहिणाबाईमोठा आशय प्रकट करतात. साध्या वाटणा-या विषयातून त्यांची सौंदर्यपूजक दृष्टी जशी प्रकट होते तशी तत्त्वचिंतकाची दृष्टीही प्रकट होते. मग त्यांचा आपल्या मनाशी संवाद सुरू होतो.

ऐका संसार संसार दोन्ही जीवाचा इचार
देतो दुःखाले होकार अन सुखाले नकार

असे जीवनाचे वास्तव चित्र उभे करून त्या मूल्यात्मक जीवनाची आस धरतात.

जग जग माझ्या जीवा असं जगनं तोलाचं
उच्च गगनासारखं धरत्रीच्या रे मोलाचं

आपल्या जीवनातील दुःखाचा समंजस स्वीकार करून त्याला धीरोदात्तपणे सामोरी गेलेली कवयित्री आपल्या मनालाच नव्हे तर सा-या दुःखी जीवांना धीर देते.

रडू नको माझ्या जीवा तुला रडण्याची रे सव
रडू हासव रे जरा त्यात संसाराची चव

जीवनाची खडतर वाट चालणा-या वाटसरूला त्या असाच धीर देतात. आपल्या शब्दांनी बळ देतात. जीवनाची वाट मोठी बिकट असली तरी त्याने डगमगू नये, वाट्याला आलेल जीवन आनंदाने जगावे, असा सकारात्मक विचार देतात.

दोन्ही बाजूनं द-या धर झुडूप हाती सोडू नको रे
धीर येवो संकट किती.

मोट ही बहिणाबाईंची एक सुंदर रूपकात्मक कविता. बहिणाबाईंनी या कवितेत सहजपणे अद्वैताचे तत्त्वज्ञान मांडले आहे. 'मोट' हाकणारा तर जीवनाचा सूत्रधार आहे.

उतरनी-चढनीचे नाव दोन धाव एक
मोट हाकलतो एक-जीव पोसतो कितीक

'माणूस' हा बहिणाबाईंच्या चिंतनाचा विषय आहे. काही कवितांमधून त्या मानवी प्रवृत्तींवर, त्यातील वैगुण्यांवर बोटे ठेवतात. 'माणूस' ही कविता यादृष्टीने

पाहाता येईल. माणूसजातीचे क्षुद्र व्यवहार पाहून बहिणाबाईंनी काकुळतीने समस्त मानवजातीलाच प्रश्न विचारला आहे.

"मानसा मानसा कधी व्हशीन मानूस?
लोभासाठी झाला मानसाचा रे कानूस"

बहिणाबाईंनी आपल्या दीर्घ अनुभवाचे संचित एका कवितेतून शब्दबद्ध केले आहे. 'कशाले काय म्हनू नही' असे त्या कवितेचे शीर्षक आहे. निसर्गातील आणि मानवी व्यवहारातील अनेक समर्पक उदाहरणे देऊन एका मूल्यात्मक जीवनाचा पुरस्कार त्यांनी या कवितेत केला आहे.

निजवते भुक्या पोटी तिले रात म्हनू नही
आखडला दानासाठी त्याले रात म्हनू नही
किंवा
येहेरीतून ये रीती तिले मोट म्हनू नही
केली सोताची भरती त्याले पोट म्हनू नही

मनोव्यापारांची बहिणाबाईंना प्रगल्भ जाण होती. 'मन' या कवितेत त्यांनी माणसाच्या अनाकलनीय, अतर्क्य आणि गूढ मनाचे दर्शन घडविले आहे.

मन जह्यरी जह्यरी याचं न्यारं रे तंतर
आरे, इचू साप बरा त्याले उतारे मंतर

ज्याच्यावर काहीच उतारा नाही ते मन खसखशीच्या दाण्याएवढे लहान; पण प्रसंगी ते आभाळातही मावत नाही. असे हे मन घडविणा-या परमेश्वराला 'मन' म्हणजे जागेपणी पडलेले स्वप्नच आहे. असे बहिणाबाईंना वाटते. गूढ मनाव्यापारांचे बहिणाबाईंनी शब्दबद्ध केलेले हे रूप आचंबित करणारे आहे.

'मी कोण' या कवितेत बहिणाबाईंनी माणसाच्या 'मी' पणावर म्हणजे अहंभावावर भाष्य केले आहे. प्रसंग आला की, माणसाचा ताठा गळून पडतो आणि 'मी' कोणीच नाही याची त्याला जाणीव होते; हे बहिणाबाईंनी मोठ्या नाट्यमय पद्धतीने सांगितले आहे.

अरे मी कोन, मी कोन? लागे ठसका जारानं
तव्हा घशातला सास म्हणे तू कोन तू कोन?

माणसाच्या ठायी असलेल्या व्यर्थ अहंकाराची बहिणाबाई खिल्ली उडवितात.

कोणतेही रूढ शिक्षण न घेतलेल्या बहिणाबाईंना उच्चारशास्त्राची उपजत जाण होती याचे आश्चर्य वाटते. त्या म्हणतात,

माय म्हनता म्हनता ओठ ओठालागी भिडे
आत्या म्हनता म्हनता केव्हडं अंतर पडे

मातेच्या आणि आत्याच्या प्रेमातील फरक बहिणाबाईंनी उच्चारशास्त्राच्या आधारे दाखविला आहे. 'म' हा ओष्ठ्य वर्ण आहे. ओठाला ओठ लावल्याशिवाय तो उच्चारता येत नाही. पण 'आ' चा उच्चार ओठ एकमेकांपासून पूर्ण दूर नेल्याशिवाय होत नाही. भाषाशास्त्रीय सत्त्यातून बहिणाबाई असे भावसत्य सांगता.

लक्ष्मीबाई टिळकांप्रमाणे बहिणाबाईही शब्दांशी क्रिडा करतात. त्यातून अभिजात विनोद निर्माण होतो.

ज्यातून पीठ येते ते जाते से, जमिनीत उभा असलेला आड कसा आणि गुढी उभारतो तो पाडवा कसा असे गमतीदार प्रश्न त्या उपस्थित करतात. निसर्गातील आणि जीवनातील गमतीदार विसंगती त्या टिपतात. विजोड दिसणा-या जोडप्याचे हे निखळ विनोदी चित्र पाहा.

उंच्या खुज्या जोडप्याची कशी जमली रे जोड
उगे ताडाखाली जसं भुईरिंगणीचं झाड

बहिणाबाईंची कविता अल्पाक्षररमणीय आहे. तिच्यात अनलंकृत सौंदर्य आहे. अहिराणी बोलीचा गोडवा आहे. बहिणाबाईंची साधी सोपी रचना रसिकाच्या मनात भावनांचे कल्लोळ निर्माण करते. चांगली कविता नेहमीच वर्तमानकाळाची असते. ती केव्हाही आस्वाद्य असते. बहिणाबाईंची कविता अशी सदोदित आस्वाद्य आहे.

'स्मृतिचित्रे' ह्या लक्ष्मीबाईंच्या लेखनाला विशिष्ट काळाचे व्यक्तींचे आणि परिस्थितीचे संदर्भ असले तरी लक्ष्मीबाईंच्या प्रतिभेने या लेखनातील तात्कालिकता काळाची चौकट आणि व्यक्तिसंबद्धता सहजपणे गळून पडली आहे. 'स्मृतीचित्रे' कोणत्याही काळातील माणसांची आणि त्यांच्या शाश्वत प्रवृत्तींची चित्रे बनतात. लक्ष्मीबाई आणि बहिणाबाई या दोघींनी नकळतपणे आणि सहजपणे भव्य साहित्यनिर्मिती केली 'वाचमर्थोअनुधावति' हे दोघींच्याही बाबतीत खरे आहे. लक्ष्मीबाई टिळक आणि बहिणाबाई चौधरी या मराठी सारस्वतीतील लक्ष्मी आणि सरस्वती आहेत.

**टीप :-** प्रस्तुत लेखातील अवतरणे पुढील ग्रंथातून

घेतली आहेत.

१) स्मृतिचित्रे लक्ष्मीबाई टिळक; रिया पब्लिकेशन, कोल्हापूर, ऑगस्ट २०१३.

२) बहिणाबाईंची गाणी - बहिणाबाई चौधरी, पॉप्युलर प्रकाशन मुंबई, आवृत्ती तिसरी, १९७८.





अनुक्रमणिका

## जुने लेखन
# फिरस्ते

चहुशः सुगीच्या संधानांत व तुरळक इतर दिवसांत गांवगन्ना जे बिछायती (बिछायत घरांत नसते, ती ओटीवर असतेः म्हणून बिछायती म्हणजे बाहेरून-पर ठिकाणाहून आलेला) येतात त्यांत कांहीं वतनदार व कांहीं उपलाणी असतात. येथें वतनदार याचा अर्थ इतकाच कीं, हे फिरस्ते नियमित काळीं नियमित रहाळांतील गांवीं येतात व तेथें आपला माल विकून, काम करून, अगर भिक्षा मागून कमाई करतात. अशा प्रकारें उघाडीच्या दिवसांत हे अनेक गांवें घेतात आणि पावसाळा ते स्थाईक झाले असतील त्या गांवीं किंवा आपले रहाळांत कोठें तरी काढतात. जे फिरस्ते नेमलेल्या गांवीं वहिवाटीप्रमाणें न येतां वाटेल तेथें भटकतात, त्यांना आपण उपलाणी म्हणूं. घिसाडी ऊर्फ पांचाळ, बेलदार, वड्डर, कैकाडी, वंजारी, लमाण, नेमाडांतील मेवाती, वैदू, गोंड, मांग-गारोडी, गोपाळ, कोल्हाटी, हरदास, दरवेशी, बंदरवाले (मुसलमान), गारोडी, माकडवाले ऊर्फ कुंचेवाले, कंजारी, नंदीबैलवाले ऊर्फ तिरमल, चित्रकथी, फांसपारधी, बहुरूपी, रायनंद, भोप्ये, भगत, भुत्ये, आराधी, वाघे, मुरळ्या, जोगती, हिजडे, जोगतिणी, कातकाडीणी (हाडकांच्या माळा घालणा-या नवलाया), भराडी, वासुदेव, पांगूळ, गुरुबाळसंतोष, राऊळ, मेढिंगे ऊर्फ ठोके जोशी, कुडमुडे जोशी, सुप हलव्या, पोतराज, कानफाटे, उदासी, अघोरी, खरे खोटे आंधळे पांगळे रक्तपित्ये वगैरे विकल लोक, नाथपंथी, वारकरी, कबीरपंथी, संन्याशी, तीर्थयात्रा करणारे नाना संप्रदायांचे गोसावी, बैरागी, जती, साधु, जातिजातींचे गुरू व मागते, मानभाव, नानकशाही, फकीर, शिद्दी, इराणी, बलुची, अफगाणी इत्यादि अनेक प्रकारचे उदरनिमित्त बहुकृत वेष लोक खळीं मागण्याला व इतर वेळी खेड्यांवर फे-या घालीत असतात. ह्यांची दिनचर्या वरवर पाहिली तर असा भास होतो कीं, त्यांपैकी कित्येकांना कांही तरी कलाकुसरीचा अगर मनोरंजनाचा दर्शनी धंदा असतो व कांहीं निवळ भिक्षार्थी असतात. परंतु बाहेरचा बुरखा जरा ओढला तर अशी खात्री होईल कीं, बहुतेकांची मदार भिक्षेवर आणि भिक्षेच्या आडून फसवेगिरी, दगलबाजी, चोरीचपाटी ह्यांवर व कांहींची व्यभिचारावार देखील असते. वतनदार व उपलाणी फिरस्ते नुसती भीक म्हणून शेकडा दोन तें चार शेतमाल हडसून खडसून नेतात. चोरीचपाटी ह्याखेरीज. फिरस्त्यांमधील वरिष्ठ जातींचे भिक्षुक व साधु हिंदू असल्यास मठांत किंवा देवळांत व मुसलमान असल्यास मशिदींत, दरग्यांत उतरतात आणि दोन्ही धर्मांचे लोक सर्रास चावडी धर्मशाळांत उतरतात. गुन्हेगार जाती साधु किंवा फकिराच्या वेषानें गुन्हे करण्यास बाहेर पडतात, तेव्हां त्या ओसाड देवळांत, मठांत, मशिदींत अगर तक्यांत उतरतात; कांकीं त्यांचीं कृष्ण कारस्थानें कोणाच्या नजरेस येऊं नयेत. बाकीच्या भटकणा-या जाती आपापलीं जाति-विशिष्ट पालें देतात. पालावरून जात ओळखतां येते. बहुतेक आपापलीं पालें गांवाच्या आंत बाहेर शेत दोन शेत दूर ठोकतात, व जमल्यास मुख्य गांवाजवळ न उतरतां गांवाच्या एखाद्या. वाडीजवळ पालें लावतात. फांस-पारध्यांना दिवा पाहण्याची अनेगा आहे म्हणून त्यांचीं पालें लोकवस्तीपासून फार दूर असतात व त्यांत दिवा म्हणून कधीं दिसावयाचा नाहीं. पिकांची, धान्याची, जनावराची चोरी पचेल अशी चोरट्या जातींच्या पालांची ठेवण असते.

**घिसाडयांचीं** दोन तें दहा बि-हाडें मुक्कामाला येतात. तीं बहुधा गांवाजवळ बारदानाच्या पालांतून उतरतात. दर बि-हाडाला दोन तें दहा गाढवें आणि एक -दोन बि-हाडें मिळून एखादी म्हैस असते. त्यांच्या जवळ तट्टें, बकरीं, कोंबड्या व मोठाले कुत्रे असतात. नांगराचा फाळ, कु-हाडी, कुदळी, वसु, खुरपीं, ऐरण, आंख, धांवा, सुळे, पळया, विळे, नाचकंडे, शिवळांचा खुळखुळा,






सुकत्या, वडारी-फावडे वगैरे लोखंड काम हे करतात. त्यांच्या बायका त्यांना लोहारकाम करूं लागतात व पळे, विळे, नाचकंडे वगैरे जिनसा बाजारांत व घरोघर विकावयास नेतात. **बेलदार** दहापांच बि-हाडें मिळून धर्मशाळेंत किंवा पोत्यांच्या पालांनी गांवाजवळ उतरतात. दर बि-हाडाला पांच तें पंधरा शेळया, कोंबड्या, गाढवें, कुत्रीं असतात. ते विहीरी, घरें, पार, वगैरेचें दगडकाम करतात व जातीं, उखळें, पाटे, वरवंटे, चौरंग वगैरे विकतात. बायका व पुरुष जात्यांना टांकी लावतात. घिसाडी, बेलदार भीक मागत नाहींत. **वड्डर** पांच-पंधरा बि-हांडें एक मेळानें गवती पालांत गांवानजीक उतरतात. दर बि-हाडाला दोन तें चार गाढवें, शिवाय शेळ्या, बोकड, कोंबडी, कुत्रीं असतात. एका गांवी गणती केली ती-पालें १४, लहान मोठीं माणसें ६०, गाढवें ३०, शेळ्या-बोकड १५, शिवाय कुत्रीं. वड्डर बांधणी घालणें, विहीरी खणणें मात-काम वगैरे मक्त्यानें करतात; जातीं, उखळ, पाटे, वरवंटे वगैरे विकतात व त्यांना टांकी देतात. माल विकणें व टांकी देणें हीं कामें बहुधा बायका करतात. ह्यांच्या बायका, पोरें गांवांत भाकरी व शेतांत धान्य मागतात. एंजिनिअरकडील मक्तेदार वड्डारींची बायका-पोरं सुद्धां गांवांत भीक मागतांना दृष्टीस पडतात. उभें पीक व मेंढरें चोरणें, पेंव फोडणें, घरफोडी वगैरे गुन्हे वड्डरांच्या कांहीं जाती करतात. ह्यांची डुकरें गांवोगांव पिकांचा धुव्वा उडवितात. कैकाडी गांवाबाहेर उघड्या पटांगणांत झाडाच्या सावलीला उतरतात. त्यांचीं चार-पांच किंवा अधिक बि-हाडें असतात. दर बि-हाडाला दोन-तीन गाढवें आणि शेळ्या, कोंबड्या, कुत्रीं असतात. ते पिटकुल, करंजी, तरवड, वगैरेंचे फोंक काढून त्यांच्या पाट्या, कणगी. कोंबड्यांचे डाले किंवा झांप करतात आणि विकतात. ही जात भीक मागणारी व चोरटी आहे. भीक मागतांना ते घरांची कुलपें काढून चोरी करतात. ज्या घरांत थोडीं माणसें असतील त्याच्या मागच्या दारीं कांहीं कैकाडणी बसतात व कांहीं जणी पुढच्या दारीं भांडून एकमेकांना रक्त निघेपर्यंत मारतात. घरांतील माणसें तंटा तोडण्याला दाराबाहेर गेलीं म्हणजे मागच्या दारीं बसलेल्या कैकाडणी आंत शिरून हातीं लागेल तें घेऊन पसार होतात. पिकें, धान्य, शेळया, मेंढ्या, कोंबड्या चोरण्यांत त्यांचा हातखंडा आहे. कुंचेवाले ऊर्फ माकडवाले ही कैकाड्यांची पोटजात आहे. ते गांवाबाहेर सुरड नांवाच्या गवताच्या पालांत उतरतात. त्यांचीं दहा-बारा बि-हाडें एकमेळानें असतात व त्यांबरोबर माकडें, गाढवें, बकरीं, कोंबड्या, कुत्रीं असतात. ते माकडांचा खेळ करतात व साळी, कोष्टी, धनगर, मोमीन वगैरेंच्या कुंच्या बांधतात. ह्या कुंच्या ते गवताच्या मुळ्यांच्या करतात; व त्या सव्वा तें दीड रुपयाला विकतात. त्यांच्या बायका बायकांना गोंधतात, शिंदीचे खुळखुळे विकतात, व सुपें, टोपलीं फोकाट्यांनीं सांधितात. बायका, पुरुष, पोरें गांवांत तुकडे व शेतांत धान्य मागतात. एका गांवीं कुंवीवाल्यांचीं ४ पालें उतरलीं होती; त्यांत माणसें २३, गाढवें २२, कुत्रीं ५, माकडें ५, बोकड २ व एक कोंबड्याचा झांप होता. **कंजारी** ही सांनसी नांवाच्या दरोडखोर जातीची एक पोटजात आहे व ती गांवाबाहेर पालांतून उतरते. ते साळी वगैरेंच्या कुंच्या बांधतात; शिंकीं, हातळ्या, जोतीं-जुंपण्या, पिछाड्या, मो-हक्या वगैरे करतात आणि कानांतला मळ काढतात. त्यांच्या बायका टाळ्या पिटून अचकटविचकट हावभाव करून उखाणे म्हणतात आणि ऐकणाराला अगदीं शरमून टाकून भीक उकळतात. **लमाण, वंजारी** हे पूर्वी बैलांचे तांडे घेऊन मीठ व सरपण ह्यांची ने-आण करीत. आतांही कांहींजण बैलांचें भाडे करतात व जनावरें राखोळीला घेतात. त्यांच्याजवळ कुत्रे फार नामांकित असतात. ते गांवाजवळ मैदानांत उतरतात आणि त्यांच्या तांड्यांत १००-२०० बैल व ५०-६० माणसें असतात. ते बैल, शेळया, मेंढ्या व उभीं पिकें ह्यांची चोरी करतात. **वैदू** गांवापासून एक-दोन शेतें दूर उतरतात. त्यांचीं दहा-बारा बि-हाडें जमावानें फिरत असतात. त्यांच्याजवळ गाढवें, शेळया, कोंबड्या व पुष्कळ शिकारीं कुत्रीं असतात. ते ससे, तरस, घोरपडी, सर्प, मगर धरतात. कोणाच्या घरीं साप निघाला तर शेरभर दाणे घेऊन ते तो धरतात. त्या वेळीं ते पुंगी वाजवीत असतात. तापीकांठीं मगरांना त्यांचा इतका दरारा आहे कीं, वैदूचा शब्द कानीं पडतांच वाळवंटांत असलेले मगर तडक पाण्यांत पळून जातात. पुरुष व बायका वनस्पतींचीं औषधें, भस्में, रांगोळीं, सुया, दाभण विकतात. पुरुष शस्त्रक्रिया करतात व तुंबड्या लावतात.

अनुक्रमणिका








पुरुष, बायका, पोरें, गांवांमध्यें भाकरी व कपडे आणि शेतांत धान्य मागतात. सर्व भटकणा-या जातींत ही जात फार साळसूद आहे व हिच्या बायकांची पातिव्रत्याबद्दल फार ख्याति आहे. वर्षां दोन वर्षांनीं पन्नास तें शंभर गोंड लोक वनस्पतींचीं औषधें, नकली सालममिश्री, सफेत मुसळी, वगैरे विकावयास एकमेळानें येतात. त्यांच्याजवळ ३०।४० म्हशी, १०।१२ तट्टें राहतात. ते गांवाजवळ पालें देतात आणि माणसाजनावरांच्या पोटासाठीं शिवार उकळतात. **भराडी, गोंधळी, मुरळ्या, वाघे** ह्यांचीं दहापांच बि-हाडें, पोत्याच्या पालांत गांवाबाहेर उतरतात. त्यांच्याजवळ तट्टें, गाई, बैल, म्हशी, टोणगे, कोंबड्या, बकरीं असतात व हीं जनावरें ते विकतात. खंडोबा, बहिरोबा, देवी वगैरे देवांचीं गाणीं, पोवाडे व लावण्या ते गातात, त्यावेळीं मंडळी जमून त्यांना पैसा दोन पैसे देते. ह्यापैंकी कांहीं बैठकीचें गाणें व तमाशा करतात. हे गावांत व शिवारांत भीक मागतात. भराड्यांच्या बायका गोदड्या शिवतात व गोंधतात. **भुत्ये** नवरात्राच्या सुमारास येऊन घरोघर तेल, पैसे व कपडे मागतात. त्यांला बहुधा दर घरीं एक पैसा मिळतो. **आराधी** वर्षभर भीक मागत फिरतात. **जोगतिणी** देवीच्या नांवानें भीक मागतात. हिंदू हिजड्यांना **जोगती** म्हणतात. ते फार करून कुंभाराच्या घरीं उतरतात. ते टाळ्या पिटून अभद्र बोलतात, बायकी चाळे करतात आणि देवीच्या नांवावर परडी फिरवून भीक मागतात. ते बहुधा दर घरीं एक आणा घेतात. मुसलमान हिजड्यांच्या गुरूला **'मुंढ्या'** म्हणतात. तो मुसलमान असतो. अलमगीरचा जनाना हिजड्यांनीं राखला, म्हणून त्यानें हिजड्यांना व मुढ्यांना वतन करून दिलें, असें हे लोक सांगतात. हिंदू-मुसलमान हिजडे आपली कमाई मुंढ्याला देतात. **पोतराज** महार किंवा मांग असतो. तो शेंदूर फांसून लहंगा नेसून मरे आईचा देव्हारा घेऊन घरोघर फिरतो, स्वतःचे अंगावर शेंदराचा गोटा लावलेल्या आसुडानें कडाके ओढतो आणि सूप अर्धसूप धान्य, पैसे व कपडे गोळा करतो. तिरमल ऊर्फ **नंदीबैलवाले, मेढिंगे ऊर्फ ठोकेजोशी, कुडमुडेजोशी, वासुदेव, पांगूळ** हे गांवाबाहेर गोदड्याच्या किंवा पोत्याच्या पालांत उतरतात. त्यांचीं दहापांच बि-हाडें मेळानें फिरतात. त्यांजवळ म्हशी, बैल, बकरें, तट्टें, कुत्रीं, असतात. तिरमल नंदीबैल शिकवून त्याच्याकडून होरा वदवितात. त्यामुळीं ते गुबगुबी व घड्याळ वाजवितात. ते धान्य, वस्त्र, पैसे मागतात. त्यांस दर घरचा १ पैसा मिळतो. त्यांच्या बायका गोदड्या शिवतात व पोत, सुई, दाभण विकतात. एका गांवीं तिरमलांचा तळ येणेंप्रमाणें होताः माणसें ३०, नंदीबैल एक, तट्टें ७, टोणगे २, म्हशी ४, बैल १०, शेळ्या ५, कुत्रीं ८ शिवाय कोंबड्या. मेढिंगे ऊर्फ ठोकेजोशी सकाळीं भस्म, गंध लावून डोक्यावर पागोट्याची ढाल ठेवून लफ्फेदार रेशीमकांठी धोतर नेसतात आणि हातांत पंचांग घेऊन कुणब्यांना शुभाशुभ ग्रह, होरा ठोका सांगण्याला शेतोशेतीं जातात. त्यांच्या बायका सुई, पात वगैरे विकतात. ते गायी, म्हशी, तट्टें, विकून हजारों रुपयांचा व्यापार करून राहिले आहेत. कुडमुडेजोशी, गुरूबाळसंतोष, वासुदेव, पांगूळ रामप्रहरीं पाऊड गाऊन आयाबायांना व लेकरांना आशिर्वाद देतात. त्यांच्या पाऊडांत यात्रांच्या ठिकाणच्या देवांचीं नांवें व क्वचित् वडिलांचीं नावें असतात. त्यांच्या बायका 'वाकळ' (गोदडी) शिवतात, व घोंगड्या तुणतात. कुडमुडेजोशी कुडमुडें वाजवितो. वासुदेव टाळ, चिपळ्या व पावा वाजवितो आणि त्याच्या डोक्याला मोरपिसांची टोपी असते; त्याला दर घरीं पैसा दोन पैस मिळतात. **राऊळ** कोठें कोष्ट्यांच्या फण्या भरतात, पण बहुधा पहाटेस भला मोठा त्रिशूळ घेऊन एखादा दोहरा म्हणत भीक मागतात. दरवेशी मुसलमान असतात, ते वाघ, आस्वल चे खेळ करून सुगीच्या दिवसांत खळीं मागतात. त्यांना बागवाले (वाघवाले) असेंही म्हणतात. **मदारी** गारोडी मुसलमान असतात व ते सापाचा आणि नजरबंदीचा खेळ करतात. मुसलमान **बंदरवाले,** वानर, माकडें व बोकड ह्यांचे खेळ करतात. **गोपाळ, डोंबारा,** कसरतीचा खेळ करतात. त्यांच्याजवळ म्हशी असतात आणि ते त्यांचें दूध तुप विकतात. गांवक-यांच्या म्हशी राखोळीला घेऊन ते अखेर गुंगारा देतात. कोल्हाटी कसरतीचा खेळ, नाचतमाशा करतात. त्यांच्या नायकिणी कसब करतात. कोल्हाट्यांचीं पालें गांवांवर आलीं म्हणजे उपदेशाचा प्रसार होतो. आपणाजवळ उपदेशाचीं व पुष्टतेची रामबाण औषधें आहेत, अशी बढाई कोल्हाटिणी मारतात, व लौकिक समजूतही अशीच आहे. खानदेशांत कोल्हाट्या-

प्रमाणें 'उघड्या मांडीचें' (राजरोष) कसब करणारी **हरदास** नांवाची जात आहे. **रायनंद, बहुरूपी, भवय्ये** (गुजराती) हे नानाप्रकारचीं सोंगें आणून पैसे, धान्य व वस्त्रें मिळवितात. ह्यांचा बेडा मोठासा नसतो. **चित्रकथी** मोठ्या जमावानें फिरतात. एका गांवीं त्यांचीं ३० पालें उतरलीं; त्यांत माणसें १२७, घोडीं ५, म्हशी ७० व १७ शेळ्या होत्या. हे म्हशींची हेड करतात व दूधतूप विकतात. जातीचा एखादा इसम सिता, बभ्रुवाहन वगैरेंचीं चित्रें काढतो व चित्रपट लोकांना दाखवितो आणि बायका काशाच्या थाळ्यावर मेण व काडी लावून परोपरीचीं गाणीं म्हणतात. तरुण स्त्रिया शेतक-यांची थट्टामस्करी करतात, व कसबही करतात; त्यांना **'नैना'** म्हणतात. पुरुष व स्त्रिया गांवांत भाकरी, वस्त्र व शेतांत धान्य, पेंढी मागतात. पिकाची चोरी करण्यात ही जात अट्टल आहे. **मांगगारोड्यांची** टोळी सर्वांत दांडगी असते. एके गांवीं त्यांचा परिवार येणेंप्रमाणें आढळून आला : - माणसें ११९, म्हशी २०, हेले ४, गाय १, बैल २, घोडे २, बकरीं ६, शिवाय कोंबड्या, कुत्रीं. हे गांवाबाहेर पालांत उतरतात, म्हशी विकतात व भादरतात, नजरबंदीचा गांवगुंडी खेळ ढोल वाजवून करतात आणि भीकही मागतात. हे जबरदस्त चोर व कांगावखोर असतात; धान्य, कापूस, शेळ्या, मेंढ्या, म्हशी, कोंबड्या चोरतात आणि उभ्या पिकांत आपलीं जनावरें चारतात. हे थोडासा विसार देऊन भाकड म्हशी फळविण्याचा बहाणा करून घेतात व त्यांना दूरच्या बाजारांत विकून पैसे गट्ट करतात. गांवकरी ह्यांच्या तांड्यांत जाण्याला धजत नाहींत. त्यांत कोणी गेलें तर पुरुष बर्दळीला येतात, व बायका एकच गिल्ल करून सोडतात आणि वेळेला सपशेल नागव्या होतात. कधीं कधीं त्या स्वतःला किंवा पोराला आपल्या हातानें दुखापत करून घेतात, अगर पोराची तंगडी धरून त्याला गरगर फिरवितात व आपटूं लागतात. **फांसपारध्यांचा** जथा फार जंगी असतो. त्यांच्या तळावर कधीं कधीं माणसें १०० पर्यंत असतात; शिवाय गाई, म्हशी, कोंबड्या, कुत्रीं. ते भीक मागतात, बजरबट्टू व जंगलच्या वनस्पतींचीं औषधें विकतात, पांखरें धरतात आणि हरीण, डुक्कर, ससे, ह्यांची शिकार करतात. त्यांच्या बायका जात्याला टांकी लावतात. ते आपलीं गुरें उभ्या पिकांत चारतात व मेवांतील धान्य, गुरें, शेळ्या, मेंढ्या व उभें पीक ह्यांची चोरी करतात आणि जमिनीमध्यें लहान भेग असेल ती खोदून तळाशीं मोठी खांच करून तिच्यामध्यें चोरीचें धान्य घालून तोंड बंद करतात. खानदेशांत सातपुड्यांतील जंगलांत प्रतिवर्षी नेमाडाकडील **मेवाती** नांवाचे मुसलमान लोक हजारों गाई-म्हशी व घोडे चारण्यास आणतात. ते जंगलाची फी भरतात, परंतु आसपासच्या गांवांच्या शेतांना त्यांचा अतिशय उपसर्ग लागतो. शेतांत राखणदार असला तरी पाण्यावर जातांना किंवा या गांवाहून त्या गांवाला मुक्काम हालवितांना ते आपल्या गुरांना शेतांत घुसण्याची इशारत देतात. मग राखण नसल्यावर रात्रीं-बेरात्रीं ते आपलीं जनावरें शेतांत घालतात हें सांगणे नकोच. त्यांचीं जनावरें इतकीं तरबेज झालेलीं असतात कीं, त्यांना परकी माणसांचा वास येतांच तीं चौखार निघतात आणि कांहीं केल्या हातीं लागत नाहींत. पहाडांत वाघाची भीती असते, म्हणून शेतांत रात्रीं राखण बहुधा नसते. त्यामुळें ह्या हेड्यांचें आयतेंच बनतें. चार-सहा वर्षांनीं बायकापोरें मिळून शेंपन्नास **इराणी किंवा बलुची, पठाण** लोकांची टोळधाड रेल्वेजवळच्या खेड्यांनीं आणि क्वचित् आडरस्त्याच्या खेड्यांनींही बोकळते. घोडे, चाकू, कात्री, सु-या, कपडा, जुने बूट, सोन्यारुप्यांची नाणीं, जवाहीर वगैरे विकण्याच्या मिषांने ते फिरतात. हिंदुस्थानावरील मुसलमानांच्या स्वा-यांमुळें त्यांचा असा दरारा बसला आहे कीं, 'घरच्या भिणें घेतलें रान वाटेंत भेटला मुसलमान.' ही म्हण महाराष्ट्रांत बायकापोरांच्या तोंडात भिजत आहे. ते लोक लालबुंद, उंचे पुरे, भलेभक्कम आणि कजाग असतात; त्यामुळें ते जातात त्या गांवांत दिवसाढवळ्या जबरदस्तीनें शिधा, चारा, लुटतात व बिगारीच्या गाड्या काढतात. त्यांच्या टोळीबरोबर पोलीस असते. पण त्याची तारांबळ उडून आला पेंड कसा तरी पुढें वाटेला लावण्याविषयीं कासाविशी चालते.

चालू वहिवाटीप्रमाणें भटकणा-या लोकांना दर गांवीं तीन दिवस राहतां येतें. गांवच्या पाटलाची किंवा एखाद्या भरदार कुणब्याची अगर स्थानिक गोसाव्या फकिराची ओळख असते, अशा गांवीं ते तळ टाकतात, व तेथून आसपासचीं गावें घेतात. मुक्कामाच्या गांवाला ते फारसा

धक्का लावीत नाहींत आणि गांव खूष राहील असा प्रयत्न करतात. त्याच गांवीं तेंच भिकार फिरून फिरून उतरू लागलें म्हणजे असें समजावे कीं गांवापासून तों नजीकचे पोलीसठाण्यापर्यंत त्यांनीं वळण बांधिलें. भिकार उतरलें म्हणजे बि-हाडें म्हाता-याकोता-यांच्या व जनावरें पोरासोरांच्या दिमतीला लावतात. जरूर तितक्या बायका सरपण व चारा गोळा करण्याला शेताशेतांनीं हिंडतात आणि उमेदवार पुरुष व बायका काळी-पांढरी मागण्याला निघतात. मुलें गायरानांनीं किंवा राखण कमी अशा शेतांच्या कडांनीं किंवा बांधांनीं जनावरें लावतात आणि आपण रमत बसतात, अगर शेताचा लांगालुंगा गोळा करण्याला जातात. त्यांच्या दुर्लक्ष्यामुळें गुरें शेतांत घुसतात आणि कधीं कधीं तर तीं स्वतःच त्यांना शेतांत घालतात, गुरेंही ओढाळ व खायखाय करीत असावयाचीं, त्यांनी शेतांत घुसावयाचें, शेतक-यांनें हैक हैक करावयाचें आणि त्यांनीं तसाच चरण्याचा रट्टा लावावयाचा किंवा मुसंडी देऊन निघावयाचें, हा त्यांचा रोजचा परिपाठ. फिरस्त्यांचीं गुरें बहुधा हातीं लागत नाहींत. यदाकदाचित जर तीं धरली तर राखणदाराला शेत मोकळें टाकून गांवांत कोंडवाड्यापर्यंत यावें लागतें. पाटील भेटला आणि गुरें ताब्यांत घेण्याला महार चावडीवर असला तर बरें आणि जर कां दोघांपैकी एकाची गाठ पडली नाहीं तर तिष्ठत बसावें लागतें. इतकी फुरसत शेतक-यांला कोठून असणार? आणि असली तरी नंगेसे खुदा बेजार. भिका-यांशी अदावत करून घरादाराचा उन्हाळा होण्याची भीती असते.

टीप :- "गावगाडा : रचणार त्रिंबक नारायण अत्रे" या १९१५ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तकातून. ❖❖❖

---












## लेखकांचा परिचय

**मुखपृष्ठावरील चित्र :**

**चित्रकार -** जितेंद्र अशोक साळुंखे,

**पत्ता :-** मल्हारपुरा, मूक-बधिर विद्यालयामागे, चोपडा, जिल्हा जळगाव - ४२५ १०७.

भ्रमणध्वनी : ९९७०७८३४०५.

**डॉ. राजेंद्र गणेश डोळके**

मराठी विषयात विद्यावाचस्पती ही नागपूर विद्यापीठाची पदवी प्राप्त. महानुभावांचे साहित्य, संत साहित्य, विदर्भातील लेखक व विद्वान यांच्या वाङ्मयाचा दांडगा अभ्यास. प्रथम काही वर्षे मराठीचे प्राध्यापक. महाराष्ट्र बँकेततील निवृत्त अधिकारी.

***पत्ता :–*** उषःकाल ३, फ्लॅट नं १०१, प्लॉट नं. १९,२० परफेक्ट को. ऑ. हौ. सोसा. इंद्रप्रस्त नगर, मोखाडे कॉलेज समोर, नागपूर. ४४००२२. भ्रमणध्वनी : ९४२२१४६२१४.

**प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

**पत्ता :-** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे - ४११००४.

दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

**श्री. के. वनपाल**

श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.

**पत्ता :-** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७. दूरध्वनी - ०२०-२५५३२१४३, भ्रमणध्वनी : ९९२२५०१४६४.

**डॉ. विनायक ना. गंधे**

प्रा. गंधे हे मराठी विभाग प्रमुख निवृत्त प्राध्यापक. डी. बी. जे. कॉलेज चिपळूण. एम. ए. पीएच. डी - एकच प्याला आणि मराठी नाट्यसमीक्षा. तसेच एकच प्याला : समीक्षा पर्व, एकच प्याला : मराठी साहित्याचे वैभव, लंपलच भावविश्व (प्रकाश संत यांच्या कथांचा अभ्यास), मराठी व्याकरण आणि लेखन, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षेच्या मराठी विषयाचे क्रमित पुस्तक इ. पुस्तके प्रकाशित.

***पत्ता :–*** सी, २०१ राधिका सोसायटी, पर्वतीनगर, सिंहगड रोड, पुणे ३०.

भ्रमणध्वनी : ९८५०६३८८२८

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

मनवभारतफमासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण मनवभारताफकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना मनवभारतफच्या संपादकांना द्यावी.

४. मनवभारतफमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात मनवभारतफमध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

रजिस्टर क्र. ११६९७/५७



हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका